


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.
वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



# महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे
# वर्धापनदिन

महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या वर्धापनदिनानिमित्ताने २६ मे २०१६ रोजी ज्येष्ठ साहित्यिक अरुण साधू यांच्या हस्ते विशेष पुरस्कार प्रदान करण्यात आले. कार्यक्रमाच्या अध्यक्षस्थानी मसापचे अध्यक्ष डॉ. रावसाहेब कसबे होते. या वेळी कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी, प्रमुख कार्यवाह प्रकाश पायगुडे, कोषाध्यक्ष सुनीताराजे पवार, विश्वस्त उल्हास पवार उपस्थित होते.




मसाप जीवनगौरव पुरस्कार स्वीकारताना ज्येष्ठ नाटककार प्रेमानंद गज्वी.



भीमराव कुलकर्णी कार्यकर्ता पुरस्कार स्वीकारताना प्रा. वैजनाथ महाजन.



रत्नाकर कुलकर्णी स्मृती कार्यकर्ता पुरस्कार स्वीकारताना राजन लाखे



रत्नाकर कुलकर्णी स्मृती कार्यकर्ता पुरस्कार स्वीकारताना ह. ल. निपुणगे




राजा फडणीस पुरस्कृत मसाप उत्कृष्ट शाखा पुरस्कार स्वीकारताना मसाप फलटण शाखेचे पदाधिकारी



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक क्र. ३५५, एप्रिल - जून २०१६



संपादक

**डॉ. पुरुषोत्तम काळे**



संपादन समिती

**डॉ. मनोहर जाधव । डॉ. नीलिमा गुंडी । डॉ. भास्कर ढोके**
**डॉ. रणधीर शिंदे । डॉ. वर्षा तोडमल । डॉ. संदीप सांगळे**



प्रकाशक

**प्रकाश पायगुडे**

प्रमुख कार्यवाह




**महाराष्ट्र साहित्य परिषद**

टिळक रस्ता, पुणे ४११०३०. दूरभाष : ०२०-२४४७५९६३

संकेतस्थळ : www.masapapune.org

ई-मेल : masaparishad@gmail.com

(कार्यालयाची वेळ : स. ९.३० ते १२, दु. ४.३० ते रा. ८)








राज्य मराठी विकास संस्थेद्वारे
संगणकीकृत






मुद्रक-प्रकाशक
**प्रकाश पायगुडे**
प्रमुख कार्यवाह
महाराष्ट्र साहित्य परिषद,
टिळक रस्ता, पुणे ४११०३०.

संपादकीय संयोजन
**संदीप खाडे**

अक्षरजुळणी व सजावट
**आर्ट ॲडव्हर्टायझिंग**

मुखपृष्ठ
**जयदीप कडू**

मुद्रितशोधन
**अशोक देव**

मुद्रणस्थळ
**पुणे विद्यार्थी गृह,**
महाराष्ट्र मुद्रणशाळा छापखाना
सदाशिव पेठ, पुणे
४११०३०.

मूल्य : १५ रुपये

प्रकाशन क्र. ३५५
एप्रिल-जून २०१६

या अंकात व्यक्त झालेल्या विचारांशी संपादक, संपादन समिती, सल्लागार मंडळ तसेच प्रकाशक सहमत असतीलच असे नाही.

# अं त रं ग





अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



# संपादकीय

## संपादकीय
### पुरुषोत्तम काळे



नवे सूर अन् नवे तराणे...

महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या २०१६-२०२१ साठी निवडलेल्या कार्यकारिणीमध्ये माझी संपादकपदी निवड झाली. माझ्यावर हा विश्वास दाखविल्याबद्दल मी कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी, प्रमुख कार्यवाह प्रकाश पायगुडे, कोषाध्यक्ष सुनीताराजे पवार आणि सर्व कार्यकारिणी सदस्यांचा ऋणी आहे. शतकोत्तर दशकपूर्ती करीत असलेल्या महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या १०३ वर्षे पूर्ण करीत असलेल्या म. सा. पत्रिकेच्या संपादकपदी निवड झाल्याने या पदावर दिग्गज संपादकांनी केलेल्या कार्याचे स्मरण करणे क्रमप्राप्त आहे. या बहुमानाबरोबरच पडलेल्या मोठ्या जबाबदारीचे सार्थ भान मला आणि संपादन समितीला आहे. पूर्वसुरींच्या थोर लौकिकाला साजेशी कामगिरी करण्याचा प्रयत्न आम्ही निश्चितच करू.

महाराष्ट्र साहित्य परिषदेचा वर्धापदनदिन साजरा होत असताना प्रा. रा. ग. जाधव सरांच्या दुःखद निधनाची बातमी आली. थोर साहित्यिक, स्वागतशील समीक्षक आणि समाजमनस्क विचारवंत ही जाधव सरांची ओळख. मृदु, आर्जवी आणि अतिशय संकोची स्वभावाचे हे व्यक्तिमत्त्व आता आपल्यात नाही यावर विश्वास बसत नाही. मराठी समीक्षेत जाधव सरांनी नव्या वाटा निर्माण केल्या. 'निळ्या पहाटे'ने दलित साहित्य प्रवाहाचे स्वागत केले. भोवताली घडणाऱ्या घटनांच्या परिप्रेक्ष्यात साहित्यकृतींचा अन्वयार्थ लावला. आपल्या विचक्षण मर्मदृष्टीने अनेकांना साहित्य संशोधनाच्या नव्या वाटा दाखविल्या. विश्वकोशाचे संपादन हे महत्त्वाचे काम त्यांनी ज्या जबाबदारीने पार पाडले ती अतुलनीय आहे. महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या वाङ्मयेतिहासाच्या सातव्या खंडाचे ते संपादक होते. हे काम करीत असताना अनेक लेखकांना महत्त्वाच्या विषयांवर त्यांनी लिहिते केले. संपादक म्हणून या प्रकल्पाला आकार देताना महेंद्र मुंजाळसारखा संपादक घडवला. जाधव सरांच्या निधनाने महाराष्ट्र साहित्य परिषदेचेच नव्हे तर महाराष्ट्राच्या सांस्कृतिक संचिताचे न भरून येणारे नुकसान झाले आहे.

प्रा. भैरव कुंभार यांचे नुकतेच निधन झाले. महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या कोल्हापूर शाखेच्या आणि दक्षिण महाराष्ट्र साहित्य सभेच्या स्थापनेपासून ते या संस्थांमध्ये कार्यरत होते. त्यांच्या जाण्याने एक सच्चा साहित्यसेवक हरपल्याची भावना आहे. ज्येष्ठ साहित्यिक बाळ राणे आणि डॉ. बाबासाहेब आंबेडकरांवर संशोधन करणाऱ्या अमेरिकन विदुषी एलिनॉर झेलिएट यांचेही नुकतेच निधन झाले. या थोर व्यक्तिमत्त्वांना म. सा. पत्रिका आणि परिषदेतर्फे आदरांजली.

मराठी साहित्य समीक्षेत आणि साहित्य व्यवहारात म. सा. पत्रिकेचे स्थान नेहमीच महत्त्वाचे गणले गेले आहे. साहित्यसमीक्षा, संशोधन, ग्रंथपरीक्षणे आणि साहित्यविश्वातील घडामोडींची दखल म. सा. पत्रिकेने नेहमीच घेतली आहे. मराठी साहित्यसमीक्षेत आस्वादक समीक्षेचे स्थान मध्यवर्ती राहिले आहे. ललित लेखनाच्या समीक्षेबरोबरच साहित्यातील वाद (इझम), साहित्य प्रकारांची बदलत जाणारी सद्यकालीन रूपे, भाषा, तत्त्वज्ञान आणि वाङ्मयेतिहास या विषयांवरील जाणकार संशोधकांचे लेख पत्रिकेत प्रकाशित करण्याचा मानस आहे. ग्रंथांचे परीक्षण प्रकाशित करताना ते अकारण गौरवपर नसावेत आणि ग्रंथात दोष असतील तर दोषदिग्दर्शन करणारे असावेत. म. सा. पत्रिका हे संदर्भमूल्य असलेले, मराठी साहित्यसमीक्षा व्यवहाराला योग्य दिशा देणारे आणि रसिक वाचकांची अभिरुची घडविणारे नियतकालिक व्हावे यासाठी विद्वान, जाणकार लेखकांना आणि समीक्षकांना पत्रिकेत लिहिण्याचे आवाहन आम्ही करीत आहोत.



अनुक्रमणिका



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

तरुण पिढी महाजालावर जे लिहिते आहे, विशेषतः महाजालावर होणारी ई-संमेलने, वाद-चर्चा आणि लेखक वाचकांच्या परस्पर संवादविषयक घडामोडींची दखल पत्रिकेतून घेतली जाईल. मराठी भाषा, व्याकरण आणि प्रमाण लेखनाविषयीचे लेख आवर्जून प्रकाशित केले जातील. म. सा. पत्रिकेसाठी आय. एस. एस. एन. क्रमांक मिळविण्याचे प्रयत्न सुरू केले आहेत. संशोधकांचे अभ्यासपूर्ण संशोधन निबंध तज्ज्ञांच्या समितीमार्फत तपासून घेऊन प्रकाशित केले जातील. म. सा. पत्रिकेला मनोरंजनपर नियतकालिकाचे स्वरूप न येता ती साहित्य संशोधन व्यवहारावर भाष्य करणारी असावी. अर्थातच हे करीत असताना ती क्लिष्ट होऊ नये, वाचनीय व्हावी यासाठी आम्ही प्रयत्नशील राहू.

या अंकात प्रा. रा. ग. जाधवांवर आदरांजलीपर लेख त्यांचे शिष्य मनोहर जाधव यांनी लिहिला आहे. आपल्या गुरूवर लिहिलेल्या या लेखातून रा. ग. जाधव समीक्षक आणि व्यक्ती म्हणून किती थोर होते याविषयी उलगडा होईल. ज्येष्ठ नाटककार प्रेमानंद गज्वी यांना म.सा.प. जीवन गौरव पुरस्कार मिळाला. गज्वींच्या लेखनप्रवासाविषयी प्रा. महेंद्र भवरे यांचा लेख रसिकांना गज्वींच्या नाट्यलेखनाविषयी वेगळी मर्मदृष्टी देईल. गो. नी. दांडेकरांचे हे जन्मशताब्दी वर्ष. गोनीदांच्या ललित लेखनावर अरुण कोळेकरांनी लिहिलेला लेख गोनीदांच्या स्मृती जागृत करेल. केशवसुतांच्या परंपरेतील आधुनिक कवी 'माधवानुज' यांच्या स्मृतिशताब्दी वर्षानिमित्त राजीव जोशी यांनी त्यांच्याविषयी आणि काव्याविषयी विवेचन केले आहे. म. श्री. दीक्षित आणि महाराष्ट्र साहित्य परिषद यांचे नाते अजोड होते. मश्रींच्या कार्याचा गौरव म्हणून परिषदेने ते ज्या पायरीवर बसत त्या पायरीचे 'मश्रींची पायरी' असे नामकरण केले आहे. या निमित्ताने त्यांचे चिरंजीव प्रा. राजा दीक्षित यांनी 'मश्रींची पायरी' या लेखातून वडिलांचे कार्यकर्तेपण आणि त्यांचे व्यक्तिमत्त्व यावर प्रकाश टाकला आहे.

ज्येष्ठ समीक्षक आणि कवयित्री डॉ. नीलिमा गुंडी यांच्या नव्वदोत्तर बदलते सामाजिक संदर्भ आणि स्त्रीलिखित कविता' हा आणि डॉ. अविनाश सांगोलेकरांचा म. सा. पत्रिकेच्या वाङ्मयीन कार्याविषयीचा लेख हे दोन्ही लेख जिज्ञासू संशोधकांना मार्गदर्शक ठरतील. डॉ. द. ता. भोसले यांनी साने गुरुजींच्या पुण्यतिथीनिमित्ताने लिहिलेला लेख एक नवी दृष्टी देईल.

समकालीन कवींच्या मालिकेत संतोष पवार यांच्या 'बहादूर थापा आणि इतर कविता' या काव्यसंग्रहावर रंगनाथ पठारे यांचा लेख पवारांच्या कवितेचे वेगळेपण अधोरेखित करणारा आहे. 'उंबरठ्यावर' या सदानंद मोरे यांच्या लेखसंग्रहावर प्रा. रूपाली शिंदे यांचा लेख मोरे सरांच्या वैचारिक लेखनावर भाष्य करणारा आहे. प्रकाशनसंस्था आणि त्यांचे प्रकल्प या सदरात डायमंड प्रकाशनचे दत्तात्रेय पाष्टे यांची मुलाखत प्रा. सुजाता शेणई यांनी घेतली आहे. 'आंधळ्यांची शाळा' या नाटकाचा नव्याने अर्थ लावणारा प्रा. नागनाथ बळते यांचा लेख हे जिज्ञासू वाचकांचे लक्ष वेधून घेतील.

महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या वर्धापन दिनाच्या निमित्ताने मसाप जीवन गौरव पुरस्कार ज्येष्ठ नाटककार प्रेमानंद गज्वी यांना देण्यात आला. तसेच भीमराव कुलकर्णी कार्यकर्ता पुरस्कार प्रा. वैजनाथ महाजन यांना प्रदान करण्यात आला. या मान्यवरांचे आणि इतर ग्रंथपुरस्कार विजेत्यांचे हार्दिक अभिनंदन!

नुकतेच साहित्य अकादमीचे पुरस्कार जाहीर झाले. मनस्विनी लता रवींद्र यांना त्यांच्या 'ब्लॉगच्या आरशापल्याड' या शब्द पब्लिकेशनतर्फे प्रकाशित झालेल्या कथासंग्रहासाठी, बालसाहित्यातील कामगिरीबद्दल राजीव तांबे यांना आणि अनुवादविषयक लेखनाबद्दल प्रा. बलवंत जेऊरकर यांना साहित्य अकादमी पुरस्कार जाहीर झाले आहेत . या सर्वांचे म. सा. पत्रिकेतर्फे अभिनंदन आणि त्यांच्या पुढील साहित्यिक वाटचालीस शुभेच्छा!

भरगच्च मजकूर असलेला म. सा. पत्रिकेचा हा ३५५ वा अंक वाचकांच्या पसंतीस उतरेल. संपादन समितीचे सर्व सदस्य आणि पूर्वसंपादक महेंद्र मुंजाळ आणि डॉ. सु. प्र. कुलकर्णी यांच्या सहकार्याबद्दल आभार. संपादनसाहाय्य करणारे संदीप खाडे, ज्योत्स्ना नांदगिरीकर, तसेच आर्ट ॲडव्हर्टायझिंगचे प्रदीप खेतमर, मुखपृष्ठकार जयदीप कडू, मुद्रितशोधक अशोक देव आणि पुणे विद्यार्थी गृह प्रेसची टीम यांचे सहकार्य यापुढेही मिळावे ही अपेक्षा आणि आभार!

सूर जुळून आले आहेत, मैफिल जमते आहे. आता अपेक्षा आहे आपल्या शुभेच्छा अन् प्रतिसादाची. ◆

**डॉ. पुरुषोत्तम काळे**
चलभाष : ९४०४९३७७१०
purushottamdkale@gmail.com

(टीप : हा अंक मसापच्या www.masapapune.org या संकेतस्थळावर तसेच डेलीहंट या मोबाइल ॲपवरही उपलब्ध आहे.)



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद



## निमित्ताने

मनोहर जाधव

■ ■

**मराठी साहित्यविश्वातले एक महत्त्वाचे समीक्षक व साक्षेपी संपादक प्रा. रा. ग. जाधव यांचे अलीकडेच दुःखद निधन झाले. मराठी समीक्षा व संपादन क्षेत्रात त्यांनी दिलेले योगदान अतिशय मोलाचे आहे. प्रा. जाधव यांच्या आठवणींना उजाळा देणारा ज्येष्ठ कवी-समीक्षक डॉ. मनोहर जाधव यांचा लेख.**

■ ■

दि. २६ मे रोजी संध्याकाळी उशिरा दिल्लीत पोचलो. दुसऱ्या दिवशी सकाळी दहा वाजता एका शासकीय बैठकीसाठी गेस्ट हाऊसबाहेर पडलो आणि खिशातला मोबाइल वाजला. फोन घेतला, तर मित्र तिकडून म्हणाला, ''रा. ग. जाधव सरांची बातमी कळली का?'' फोनवरचे वाक्य ऐकताच काय घडले असेल याचा अंदाज आला. मित्राशी बोललो. मनात चलबिचल झाली. अस्वस्थतेतच बैठकीच्या ठिकाणी पोचलो. नेमके आपण परगावी आणि ही घटना घडली याचे मनोमन दुःख झाले. अखेरच्या दिवसांत सरांना भेटताही आले नाही. 'साधना'चे संपादक विनोद शिरसाठ यांच्याशी बोलून भेटायचे ठरले होते. नाहीच जमले ते. अस्वस्थतेतच विनोदजींना एसएमएस केला. अशा वेळी माणसाची मनःस्थिती कशी होते हे आपण सगळेच जाणून आहोत. सरांच्या अनेक आठवणी मनात दाटून आल्या.

१९९५ पासून मी सरांच्या सहवासात आलो. पण त्याआधी म्हणजे १९९४ साली पुण्यातील खडकी परिसरात अस्मितादर्श साहित्य संमेलन झाले त्या वेळी त्यांची विशेष उपस्थिती होती. या संमेलनात त्यांचा गौरव करण्यात आला. सरांची प्रकृती बरी नव्हती. ते मनाने खचले असावेत असे वाटत होते. एक-दोघांनी त्यांना आधार देऊन स्टेजवर नेले. त्या वेळी मी त्यांना पहिल्यांदा पाहिले होते. त्यांच्या अंगभूत साधेपणामुळे समोरच्या माणसावर दडपण येत असे. ते साधे राहत असले तरी टापटीप, नेटकेपणा त्यांच्याजवळ होता. प्रकाशन समारंभ असो की व्याख्यान, सर छान दाढी करून येत. शर्ट पँटमध्ये नीट खोचलेला, कमरेला चामडी पट्टा. शर्टचे अगदी गळ्याजवळचे पहिले बटण ते लावून घेत. बोलताना त्यांची छान तंद्री लागत असे. सौम्य आवाजात पण मुद्देसूद मांडणी करीत. विषयाच्या अनेक बाजू समोर आणत. समोरच्याने विचारप्रवृत्त व्हावे असे त्यांचे विश्लेषण असे. डॉ. कोत्तापल्ले सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठात मराठी विभागात प्रमुख असताना जाधव सर एम. ए.च्या विद्यार्थ्यांना शिकवायला येत. विशेष लेखकाचा अभ्यास म्हणून प्र. के. अत्रे अभ्यासाला होते. सरांनी या विषयाची टिपणे काढली होती. पुढे याच विषयावर म्हणजे अत्रे आणि त्यांच्या साहित्यावर त्यांनी पुस्तक लिहिले. 'शिक्षकावर व्यवस्थेने सोपवलेल्या इतर कामापेक्षा त्यानं शिकवणं हेच खरं तर मोठं काम आहे', असे एक विधान त्यांनी खासगीत केलेले आठवते. वर्गातून आल्यावर ते माझ्या केबिनमध्ये येत. त्या वेळी मी सर्वांत ज्युनियर होतो. ते निवांत बसत. सिगरेट आणि चहा त्यांना प्रिय. त्यांनी सिगरेट शिलगावली की मी एक कागद घेऊन विक्रेता शेंगदाणे देण्यासाठी कागदाचा जसा द्रोण करतो तसा त्यांना ॲश ट्रे म्हणून तो द्रोण दोन-तीन वेळा करून दिल्याचे आठवते. त्या वेळी त्यांच्या चेहऱ्यावर बालसुलभ हास्य उमटत असे. तोपर्यंत त्यांना प्रिय






अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

असलेला चहा आमच्या कर्मचाऱ्याने आणलेला असे. जाधव सरांशी मराठी विभागाने सतत संपर्क ठेवला होता. डॉ. कोत्तापल्ले कुलगुरू झाल्यानंतर जाधव सरांच्या हस्ते विद्यापीठाच्या मुख्य इमारतीच्या सभागृहात त्यांचा सत्कार ठेवला होता. ते आनंदाने आले होते. माझ्याकडे जेव्हा मराठी विभागाची जबाबदारी आली तेव्हा मी काही चर्चासत्रांचे उद्घाटन आणि समारोप करण्याची विनंतीही त्यांना केली होती. त्यांनी कधी नकार दिला नाही. येण्यासाठी ना कोणती अट ना बडेजाव. फक्त कार्यक्रम वेळेवर सुरू व्हावा अशी त्यांची अपेक्षा असे. उद्घाटन केल्यावर मात्र ते दुपारी जेवायला थांबत नसत. चहा मात्र आवर्जून घेत. चर्चासत्रातील आपली भूमिका ते इतक्या ठोसपणे आणि चोखपणे निभावत असत की सभागृहात त्यांची मुद्रा आणि त्यांच्या गंभीर प्रतिपादनाचे तरंग उमटत असत. वातावरणात सुखद गांभीर्य दरवळत राही.



जाधव सर समीक्षक म्हणून तर मोठे होतेच, पण माणूस म्हणूनही ते मोठेच होते. नव्या पिढीतील अभ्यासकांशी, विद्यार्थ्यांशी त्यांचा संवाद असे. विद्यार्थ्यांना त्यांचा आदरयुक्त धाक होता पण भीती नव्हती. सरांशी कसे बोलावे असा संकोच नव्हता. त्याचे कारण जाधव सर चटकन विद्यार्थ्याला बोलण्यातून आपलेसे करून घेत. आस्थेने त्याचे म्हणणे ऐकून घेत. त्याची चौकशी करीत. तो कोणत्या विषयात, क्षेत्रात काम करतोय त्याबद्दल जाणून घेत. नव्या पिढीसोबत असले की नव्या गोष्टी कळतात, असे त्यांचे मत होते. आमच्या मराठी विभागातील किती तरी विद्यार्थ्यांना त्यांच्याशी संवाद करताना मी पाहिले आहे. प्रा. रा. ग. जाधव, डॉ. नागनाथ कोत्तापल्ले, डॉ. अ. वा. कुलकर्णी अशी काही मोठी पण मोजकीच माणसे मी नव्या पिढीसोबत संवाद करताना पाहिली आहेत. बहुधा त्यांच्या तीव्र सामाजिक जाणिवा आणि काळाचे भान हे कारण यामागे असावे. असो.

औरंगाबाद येथे झालेल्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे जाधव सर बिनविरोध अध्यक्ष झाले तेव्हा प्रथेप्रमाणे साहित्य परिषदेने त्यांचा सत्कार केला. त्या वेळी सर्व थरांतील रसिक प्रेक्षक, कवी लेखक मोठ्या संख्येने हजर होते. हजर असलेल्यांपैकी अनेकांनी त्यांचा व्यक्तिगत सत्कार केला. जाधव सर रोज सकाळी किंवा दिवसभरात जमेल तसे ज्या हॉटेलमध्ये चहा घ्यायला जात त्या हॉटेलमालकानेदेखील त्यांचा उत्स्फूर्त सत्कार केला आणि सभागृहात टाळ्यांचा कडकडाट झाला. एक आनंदाची लाट वातावरणात निर्माण झाली. जाधव सरांनी संकोचून पण गालातल्या गालात हसून मनःपूर्वक हा सत्कार स्वीकारला. मला वाटते, या सत्काराने जाधव सरांबाबत सभागृहाला त्या वेळी बरेच काही सांगून टाकले. जाधव सरांचे थोरपण अशा काही छोट्या घटनांमधून अनेकदा समोर येत असे. महाराष्ट्राच्या वाङ्मयीन आणि सांस्कृतिक विश्वात प्रतिष्ठा आहे अशा काही पुरस्कार समित्यांवर जाधव सरांसोबत काम करण्याचा अनुभव अस्मादिकांना मिळाला आहे. सर निकषांबाबत खूप काटेकोर असत आणि व्यक्ती वा साहित्यकृतीबाबत चोखंदळ; पण समिती सदस्यांना स्वातंत्र्य असे, दडपण नसे आणि हस्तक्षेप तर अजिबातच नसे.

जाधव सरांनी अनेक नवोदित लेखकांच्या पुस्तकांना प्रस्तावना लिहिल्या. ब्लर्बसाठी मजकूरही दिला त्यात माझे काही मित्रही होते. माझ्या कवितासंग्रहालाही त्यांनी अभिप्राय लिहिला. माझ्या पीएच. डी. पदवीच्या प्रबंधाचे ते परीक्षक होते आणि विद्यापीठात माझी मौखिक परीक्षाही घ्यायला ते आले होते. प्रबंधाचे पुस्तक व्हायला हवे, ही त्यांची सूचना मी वर्षभरातच अमलात आणली. राजीव लॉज, अनपट बिल्डिंग येथे ते राहत असत त्या वेळी एकटा किंवा मित्रांसोबत मी अनेकदा त्यांच्याकडे गेलो आहे. एकटा असलो की सायकलवर जायचो. त्या वेळी ते म्हणायचे, बाइक घेऊन टाक. पुण्यात बाइकशिवाय पर्याय नाही. पुढे यथावकाश मी बाइक घेतली. एकदोन वेळा त्यांना कार्यक्रमाला बाइकवर घेऊन गेलो. एका बाजूला दोन्ही पाय सोडून ते बसत. आपल्यालाच संकोच वाटायचा. त्यांना भेटल्यावर ते वेगवेगळ्या विषयांवर चर्चा, मार्गदर्शन करीत. आपण कमी बोलायचे, सरांचे ऐकत राहायचे, असे आमचे धोरण असायचे. भेटल्यावर सर आवर्जून चहा प्यायला हॉटेलमध्ये घेऊन जात. क्वचितच कोणी तरी त्यांच्याकडून चहा न पिता आलेला असेल. चहा आणि चर्चा त्यांच्या आवडीचाच भाग होता. सर प्रत्येक काम मनःपूर्वक झोकून देऊन करीत. साहित्य परिषदेचा वाङ्मय इतिहास लेखनाचा प्रकल्प असो की 'साधना'चे विश्वस्त म्हणून जबाबदारी असो, शिस्तबद्धता आणि वेळेचे काटेकोर पालन हे तर त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचे वैशिष्ट्य होते. त्यांच्या व्यक्तिमत्त्वात विलक्षण असे मिश्रण होते. एखादी गोष्ट आवडली की गालात हसून, किंचित संकोचून ते हात जोडून फक्त पंजे हलवून टाळ्या वाजवून दाद देत असत. ही दाद खूप मनापासून असायची. समोरचा माणूसही सुखावून जात असे. आता अशी दाद आणि असे व्यक्तिमत्त्व आठवणीतच उरले आहे. ●

**डॉ. मनोहर जाधव**
चलभाष : ९८२२८५०२९०



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

# महाराष्ट्र साहित्य परिषद

टिळक रस्ता, पुणे - ४११०३०.

## वार्षिक सर्वसाधारण सभेची सूचना

दि. २८/६/२०१६

महाराष्ट्र साहित्य परिषदेची वार्षिक सर्वसाधारण सभा रविवार दि. २८ ऑगस्ट २०१६ रोजी पुणे येथे परिषदेच्या माधवराव पटवर्धन सभागृहात दुपारी ४.३० वाजता परिषदेचे अध्यक्ष डॉ. रावसाहेब कसबे यांच्या अध्यक्षतेखाली आयोजित करण्यात आली. या सभेला सभासदांनी वेळेवर उपस्थित राहून सहकार्य करावे, अशी विनंती आहे. सभेत खालीलप्रमाणे कामकाज होईल.

### सभेत करावयाची कामे

१. श्रद्धांजली
२. मागील सभेचे इतिवृत्त वाचून संमत करणे.
३. २०१५-२०१६ या वर्षांचे कार्यवृत्त संमत करणे.
४. २०१५-२०१६ या वर्षांचे ताळेबंद आणि उत्पन्न-खर्चपत्रक संमत करणे.
५. २०१६-२०१७ चा अर्थसंकल्प संमत करणे.
६. २०१६-२०१७ करिता हिशेब तपासनीसांची नेमणूक करणे.
७. अध्यक्षांच्या परवानगीने येणारे आयत्या वेळचे विषय.

आपला,
**प्रकाश पायगुडे**
प्रमुख कार्यवाह

**विशेष सूचना**

१. पुरेशी गणसंख्या नसल्यास सभा १५ मिनिटे स्थगित करण्यात येईल व नंतर ती रीतसर सुरु होईल. अशा वेळी गणसंख्येचे बंधन असणार नाही.
२. वरील कामकाजासंबंधी मतदार सभासदांस काही सूचना करावयाच्या असतील, माहिती पाहिजे असेल वा ठराव मांडायचा असेल तर लेखी स्वरूपात तसे २० ऑगस्ट २०१६ पर्यंत कळवावे. नंतर आलेल्या सूचनांचा विचार केला जाणार नाही.



अनुक्रमणिका



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद



निमित्ताने

महेंद्र भवरे

# सामाजिक बांधिलकी जपणारा नाटककार
# प्रेमानंद गज्वी



प्रेमानंद गज्वी हा सर्वसामान्यांसारखा वाटावा असा दिसणारा इसम. प्रथमदर्शनीच हे त्याचे रूप हळूहळू उलगडून पाहिल्यास त्याचे सामान्य रूप गळून पडते व एक वेगळेच विशेष रूप प्रत्ययाला येते. पण त्यासाठी त्याच्या प्रवासातील खाचखळगे शोधावे लागतात. थोडे सिंहावलोकन केले तर असे दिसते, की वयाच्या पंधराव्या वर्षीच या माणसाने नाटकाला हात घातला होता. नाटकात कामेही केली होती. शाळकरी वयात तो भजनात रंगला होता. कव्वाल्यांत त्याने सहभाग नोंदवला होता. पुढे पोटापाण्यासाठी त्याने मुंबईचा रस्ता धरला. तिथेही त्याचा कव्वालीचा नाद सुटला नाही. त्या काळातील गोविंद म्हशीलकर या एका मोठ्या कव्वालासोबत त्याने शागिर्दी केली. हे सारे पाहिल्यानंतर त्याच्यातील ओबडधोबड कलावंत कसा घडपडत होता याची प्रचिती येते. या धडपडीला त्या वयातील एक प्रेमसुलभ कोपरा आपल्या प्रणयगीतातून प्रीतीच्या निर्भरशील वृत्तीला शब्दाने आकार देत होता. मग हळूहळू समज प्रगल्भ झाली आणि समाजभान उत्कट होत गेले. अन्यायाच्या विरोधातील चीड, उद्वेग, माणूस, समाज, वर्तमान, वर्तमानातील सांस्कृतिक भूमीवरच्या अध्यात्माच्या आवरणातील व्यभिचारी वर्तनाला शब्दबद्ध केले आणि एक कवी उदयाला आला.

कविपणाच्या जोडीलाच कथेची 'लागण' झाली आणि कवी-कथाकार अशी गोळाबेरीज सुरू झाली. पण ही 'लागण' भूतमात्राऐवजी अद्भुताची होती, म्हणून ती काही वास्तवाच्या रणभूमीवर उभी राहू शकली नाही. मात्र, वाचकांना गुंगवण्याचा सपाटा तिने लावला होता. अद्भुत, कल्पनारम्य, भयकारी, सुरस आणि चमत्कारिक अशा करमणूकप्रधान पर्यावरणात ही कथा हेलकावे खात राहिली. परिणामी, हाताशी काहीच लागले नाही. तिथून पुढे दोन वर्षांनी या कलंदर माणसाला कादंबरीचा नादखुळा लागला. इथे मात्र हा लेखकू वास्तवाच्या भूमीवर पाय ठेवताना दिसतो. करमणुकीकडून त्याने एकदम 'जागर' घालायलाच सुरुवात केली. आपल्या अस्तित्वाचे भान, शिक्षण, प्रबोधन, सदसद्विवेकबुद्धी या सर्वच गोष्टींचा अन्यायाविरोधात वापर करण्याचा संदेश गज्वींनी कादंबरीतून दिला. सरंजामी सत्ताव्यवस्थेच्या विरोधातील विद्रोहाचे नाट्यात्म दर्शन घडविले. एक संघर्षशील नाट्यबीज त्यांनी रुजू घातले. तिथेच गज्वींचा नाटककार म्हणून जन्म झाला.

प्रेमानंद गज्वी हे केवळ दलित जीवन आणि समस्या एवढ्याच चाकोरीत स्थिरावतात असे दिसत नाही. त्याही पलीकडे जाऊन भारतीय समस्या आणि मनोवृत्तीचा ते वेध घेतात. नाटकांच्या माध्यमातून गज्वींनी फार मोठा सांस्कृतिक हस्तक्षेप केला आहे. मराठी रंगभूमीवर धंदेवाईक नाटकांपासून प्रायोगिक नाटकांपर्यंतची वाटचाल पाहावयास मिळते. 'हिट आणि हॉट' नाटके जशी आली तशीच निर्वाणापासून वस्त्रहरणापर्यंतची नाटके सादर झाली. धंदेवाईक, भाविक, सोज्वळ आणि उथळ नाटकांबरोबरच मानवी प्रवृत्तीचा वेध घेणारी नाटके आली आणि गेली. अशा वेळेस छबिलदासी नाटकांनी तथाकथित अभिरुची बदलण्याचे काम केले. तिथेही गज्वींच्या नाटकांनी एक वळण घेतलेले दिसते.



'घोटभर पाणी' या एकांकिकेने गज्वींचे नाव सर्वदूर पोहोचले. डझनभरापेक्षा अधिक एकांकिका त्यांच्या नावावर आहेत, मात्र 'घोटभर पाणी'चे यश अभूतपूर्व आहे. दांभिक संस्कृती, क्रांतीचे वांझोटे अर्थ, माणसाला गुलाम करणारी वर्णव्यवस्था, वर्णवाद्यांनी जन्माला घातलेल्या वांझ कल्पना, अशा अनेक बाबींवर भाष्य करून या एकांकिकेने प्रेक्षकांना व वाचकांना हादरवून सोडले. विविध एकांकिकांमधून



अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



**प्रेमानंद गज्वी हे साठोत्तरी काळातले मराठीतले महत्त्वाचे नाटककार आहेत. सामाजिक भानाचे खणखणीत नाणे रंगभूमीवर दीर्घकाळ निनादत ठेवण्याचे मोठे आणि महत्त्वाचे कार्य गज्वींनी पार पाडले आहे.**
**रूढ चाकोरी नाकारून वेगळ्या मार्गाने वाटचाल करणाऱ्या या संवेदनशील नाटककाराला यंदाचा महाराष्ट्र साहित्य परिषदेचा 'मसाप सन्मान' देऊन गौरविण्यात आले.**
**या निमित्ताने प्रेमानंद गज्वी यांच्या वाङ्मयीन कार्यकर्तृत्वावर प्रकाश टाकणारा ज्येष्ठ अभ्यासक-समीक्षक डॉ. महेंद्र भवरे यांचा लेख.**

त्यांनी अनेक आशयसूत्रे प्रसृत केली. माणुसकीचा, सत्याचा खून पाडणारी प्रवृत्ती, ब्राह्मणी मानसिकता, दुबळ्या माणसाची अगतिकता, बांडगुळी परोपजीवी पण शोषक उद्दाम प्रवृत्ती, नैतिकता-अनैतिकता, मंदिरकेंद्री स्त्रीशोषण व्यवस्था अशी अनेक सूत्रे प्रत्ययाला येतात. व्यवस्थेचे आकलन, तिच्यामागचा कार्यकारणभाव समजला की बंडखोरीच्या दिशाही निश्चित होत असतात. तीव्रोत्कट सामाजिक भान असणारे कलावंत वास्तव पुढ्यात ठेवून समाजाला अंतर्मुख करीत असतात. गज्वींकडे ती क्षमता आहे. पारतंत्र्यापासून मुक्त झालेली 'भारतमाता' जणू काही इथल्या राजकारण्यांची मुक्त बाजारपेठच झाली आहे, हे स्वातंत्र्यापासून आजवरचे अस्वस्थ करणारे वास्तव उपहासिक मिश्किलीने सांगण्यात गज्वींचा हातखंडा आहे. त्याचबरोबर वर्गजाणिवेसह वृत्ती-प्रवृत्ती, बुद्धिवाद आणि निर्बुद्धपणे घेतलेला निर्णय, या संघर्षासह रूपकात्मक मांडणीसोबत आकलनसुलभ काव्यात्म भाषा हे गज्वींच्या नाट्याचे बलस्थान आहे. सांस्कृतिक इतिहास आणि वर्तमानाच्या द्वंद्वाचा काव्यात्म नाट्यानुभव देणे हे गज्वींचे सामर्थ्य आहे.

काही मराठी नाटकांनी दलित जीवनाचे चारित्र्यहनन, स्त्रियांचे चारित्र्यहनन, हास्यास्पद ठरविलेले दलित जीवन हा मनोरंजनाचा भाग ठरविला. तेंडुलकरी नाटके प्रामुख्याने ब्राह्मणी मध्यमवर्गीय प्रेक्षकांसाठी होती. त्यांच्या नाटकात शेवटी विजयी होणारा माणूस धर्मनिष्ठ असतो. दळवींनी दलितांना नायकत्व देण्यास नकारच दिला. एका मूल्यासाठी झगडणारी संस्कृती दलितांची असते. त्यासाठी दलितांचे संघर्ष उभे राहतात. हे वास्तव नाकारण्याचे काम दळवींनी केले. बंड करणारा बंडा दिसूच द्यायचा नाही याची त्यांनी दक्षता घेतली. डी-ब्राह्मीण न झाल्याचा हा परिणाम! दलित आदिवासींच्या आंदोलन आणि संघर्षाच्या काळात मतकरी आंदोलनाला चेतना देणारा हा माणूस ब्राह्मण असल्याचे दाखवतात. चिरेबंदी वाड्यातून क्षीण परंपरांचे पुनरुज्जीवन केले जाते. ज्या वाड्याच्या





अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

पायऱ्यांवर 'पायरी'ने वागून दलित आदिवासींच्या पिढ्या बरबाद झाल्या, हे वास्तव त्यांच्या नाट्यप्रदेशाच्या आवाक्यात आले नाही. अशा पार्श्वभूमीवर गज्वींची नाटके अधिकच आश्वासक वाटतात. कारण ती नवता आणि वेगळेपण सिद्ध करणारी ठरली आहेत. अनुकरणातून समस्या मांडणाऱ्या, ब्राह्मणी मानसिकतेला खूष करणाऱ्या, तत्कालीन खळबळजनक तपशील मांडून परिवर्तनाला गुळगुळीत करणाऱ्या मराठी नाटकांच्या पार्श्वभूमीवर गज्वींची नाटके वास्तवाधिष्ठित आणि सामाजिक गंभीर स्वरूपाची ठरली आहेत. तनमाजोरी, देवनवरी, पांढरा बुधवार, जय जय रघुवीर समर्थ, किरवंत, गांधी आंबेडकर इ. मैलाचा दगड ठरावीत अशी ही नाटके आहेत. या नाटकांनी सामाजिक-सांस्कृतिक जीवनातील प्रखर सत्याला गवसणी घातली आहे. ब्राह्मणी आणि भारतीय स्मशानभूमीवरील संघर्षनाट्य चितारले आहे. ब्राह्मणी धर्माची पोलखोल करीत करीत त्यांच्या पोटभरू युक्त्या-प्रयुक्त्यांची खिल्ली उडविली आहे. माणसाच्या विकासाला बांध घालणाऱ्या; माणसाला अस्पृश्य, दास आणि गुलाम करणाऱ्या वर्णव्यवस्थेला, हिंदुत्वाला नकार दिला. ब्राह्मणी दमनशाहीचे स्वरूप स्पष्ट करतानाच श्रोत्यांना अंतर्मुख करण्याचे भानही बाळगले.

मूलभूत विषय केंद्रवर्ती ठेवून त्याची व्याप्ती वाढवत नेणे, असेही एक सूत्र गज्वींच्या कलाकृतींमधून प्रत्ययाला येते. उदा. पाणी ही नैसर्गिक गोष्ट. त्यावर हक्क साऱ्यांचाच. पाण्याइतके सुंदर तत्त्व दुसरे कोणतेच नाही. त्या तत्त्वाला मलीन करण्याचे, त्या तत्त्वापासून माणसाला दूर ठेवण्याचे कार्य या देशाच्या संस्कृतीने केले आहे. रोहिणी नदीच्या पाण्याचा तंटा पाण्याच्या हिश्शाबद्दल होता. इथला संघर्ष माणसाला पाण्यापासून दूर ठेवल्यामुळे निर्माण झाला आहे. एकीकडे पाण्याचा निर्मळपणा ही नैसर्गिक बाब दुसरीकडे संस्कृतीचा दूषितपणा ही मानवनिर्मित बाब. ग्रामव्यवस्थेपासून अभिजनांपर्यंत साऱ्यांचीच मने दूषित झाली आहेत. जातीय मानसिकता क्रूर आणि छळवादी आहे. पुरोगामी म्हणवल्या जाणाऱ्या चळवळी सत्ताधिकाऱ्यांनी खिशात घातल्या. आर्थिक महासत्तेची क्रूरता माणुसकीला काळिमा फासू शकते, वाचा बंद करून कृतिहीन करू शकते. मग मानवतावादी आंदोलने, चळवळी गटांगळ्या खात तळाशी जाऊन बसतात. 'घोटभर पाणी' ते 'डॅम इट अनू गोरे'पर्यंत ही व्याप्ती आहे.

सांस्कृतिक संदर्भात 'किरवंत'ची व्याप्ती तर फार मोठी आहे. ब्राह्मणी धर्म आणि धर्माच्या आधारे माणसाला दास बनवणारी प्रवृत्ती किती क्रूर आहे! भारतीय संदर्भात वर्णव्यवस्थेतील शूद्र जाती-जमाती आणि ब्राह्मणातील किरवंत या एकाच नाण्याच्या दोन बाजू आहेत. ब्राह्मणाची स्वतःच्या जातीप्रती आणि अस्पृश्य जातीप्रती असलेली अनीती आणि भेदनीती सारखीच आहे, हे सांगण्याचे धाडस असणारा गज्वींमधील सामाजिक भानाचा पिंड कसोटीवर उतरला आहे. सामाजिक भानाचे खणखणीत नाणे रंगभूमीवर निनादत ठेवण्याचे मोठे आणि महत्त्वाचे कार्य गज्वींनी पार पाडले आहे. भारतीय समाजातील अस्पृश्यतेची व्याप्ती किती मोठी आहे हे लख्खपणे प्रकाशित केले आहे. जातीला जन्म देणाराही ब्राह्मणच आणि जातीयता जोपासणाराही ब्राह्मणच, हे समीकरण गज्वींनी सोडवून दाखविले आहे. रूढार्थाने येथे नायक नाही. पराभूत, लाचारी वृत्ती आणि बंडखोर आक्रमक वृत्ती असे हे द्वंद्व आहे. स्थितिशील लाचार जाणीव आणि विद्रोही, परिवर्तनशील जाणीव असा हा संघर्ष आहे. धार्मिक मूलतत्त्ववादाच्या विरोधात सामाजिक जाणिवा प्रखर झाल्या पाहिजेत, असा संदेश गज्वींना द्यावयाचा आहे. त्यातून काही प्रश्न उपस्थित होतात. ते म्हणजे सर्वोच्च समजल्या जाणाऱ्या समाजगटाला खरंच प्रबोधनाची आवश्यकता असते काय? असे का घडते? अस्पृश्यतेची जाणीव ही जे जन्माने अस्पृश्य नाहीत अशा समूहावर का, हा खरा प्रश्न आहे. ही अस्पृश्यतेची व्याप्ती गज्वी आंबेडकरवादी असल्यामुळे त्यांना कळू शकली. गज्वी हे दलित रंगभूमीच्या चळवळीतील नाटककार आहेत. अखिल भारतीय दलित नाट्यसंमेलनाचे ते अध्यक्षही होते. गांधी-आंबेडकरांचे वैचारिक आणि धोरणात्मक संघर्ष स्पष्ट करणारे नाटक त्यांनी लिहिले. सर्वसामान्यांच्या मनात असलेल्या शंका-कुशंकांचे निरसन करण्याचा प्रयत्न या नाटकांनी केला. विषयाची व्याप्ती वाढवत नेणारे गज्वी, त्यांच्या नाटकाला व्याप्तीप्रमाणे मर्यादाही आहेत हेही मान्य केले पाहिजे. चळवळीतील नाट्याविष्कार हा विशिष्ट तत्त्वज्ञान आणि ध्येयवादावर अधिष्ठित असल्यामुळे गांधी-आंबेडकर हे नाटक ध्येयवादाला टोकदार करणारे असायला हवे होते. मात्र व्यावसायिक दृष्टिकोनामुळे सर्वांनाच खुश करण्याच्या नादात काही मर्यादा पडल्या असाव्यात. बाबासाहेब आंबेडकरांची प्रतिमा आंबेडकरी समाजाला चांगलीच वाटावी असा प्रयत्न आहे. मात्र, आंबेडकरांची मुस्लिमविषयक भूमिका आधाराला घेऊन ते अधिक ताणत नेतात. एवढी, की जणू काही आंबेडकर मुस्लिम विरोधक होते असे वाटावे. हिंदूंना खूष करण्याचा हा प्रयत्न आहे का?



गांधी-आंबेडकरांसारख्या महान विभूतींचे दर्शन गज्वींनी मराठी रंगभूमीवर पहिल्यांदाच घडविले. दोन महापुरुषांचे आचार-विचार, भूमिका आणि सडेतोड युक्तिवाद यातून सुत्र करणारा नाट्यानुभव त्यांनी दिला. हा आविष्कार रंगभूमीच्या इतिहासातील महत्त्वाचा टप्पा ठरला.



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

हिंदुत्ववाद्यांना सुखावणाऱ्या चर्चा अनावश्यक लांबवत न्यायच्या. अशा व्याप्तीला मर्यादित करणाऱ्या बाबीही प्रत्ययाला येतात. असे असले, तरी मराठी रंगभूमीच्या ध्यानीमनी नसणारा वैशिष्ट्यपूर्ण आविष्कार 'गांधी-आंबेडकर'च्या निमित्ताने झाला, हे गज्वींचे एकमेव श्रेय आहे हे मात्र मान्य केले पाहिजे. तर असे हे प्रेमानंद गज्वी रूढ चाकोरी नाकारून वेगळ्या मार्गानेही वाटचाल करताना दिसतात. कुमारी माता, वांझ स्त्रिया यांची दुःखे, देवदासीचे दुःख अशा स्त्रीजीवनाच्या समस्यांना ते केंद्र करतात. कवीचे मन, कवी, नाटककार, कलावंत अशा अनेकविध विषयांना केंद्र करून नवी वाट चोखाळतात आणि कलेपेक्षा जगण्याचा क्षण थोर असतो हेही दाखवून देतात.

गांधी-आंबेडकरांसारख्या महान विभूतींचे दर्शन गज्वींनी मराठी रंगभूमीवर पहिल्यांदाच घडविले. दोन महापुरुषांचे आचार-विचार, भूमिका आणि सडेतोड युक्तिवाद यातून सुत्र करणारा नाट्यानुभव त्यांनी दिला. हा आविष्कार रंगभूमीच्या इतिहासातील महत्त्वाचा टप्पा ठरला. बलसत्तेची स्वार्थलोलूप खेळी, सत्यनिष्ठेचा गळा घोटणारी क्रूर सत्ता, अशा सत्तेचा मुजोरीपणा आणि बलसत्तेचे अघोरी नमुने गज्वींच्या नाटकांनी पेश केले. बलसत्ता आणि ज्ञानसत्ता असा संघर्ष चित्रित करून ज्ञानसत्तेचा विजय अधोरेखित केला. बेबंदशाहीचा पाडाव करण्यासाठी बंडाला आकार प्राप्त करून देणाऱ्या जाणिवेची अपरिहार्यता त्यांच्या नाटकांनी स्पष्ट केली. सनातनी ब्राह्मणांच्या संस्था-संघटनांतर्गत चालणारे राजकारण, शह काटशह, पेशवाईचे स्वप्न पाहणारे ब्राह्मण, जातिवादी संघ, पढीक ब्राह्मणांचे राजकारण, या पढिकांनी घेतलेले बुद्धिवाद्यांचे बळी अशी आशयसूत्रे मांडणारी राजकीय नाटके गज्वींनी रंगभूमीला दिली आहेत. व्यवस्थेचे बळी ठरलेल्यांचा विद्रोह प्रकट करून भारतीय समाजातील जाति समस्या मांडली. परिवर्तनाबद्दल बोलणारी, शोषक सत्तेच्या अस्ताची अपरिहार्यता दाखवून देणारी, शोषक सत्तेच्या विरोधात प्रखर राजकीय भूमिका घेणारी नाटके सादर केली. त्यातून प्रेमानंद गज्वी हे वेगळे रसायन असल्याचे अधोरेखित झाले आहे. फुले-आंबेडकरांना अभिप्रेत असणारा मानवी समाज निर्माण झाला पाहिजे, माणसातील कुरूपता लोप पावून माणसाचे सुंदर जग निर्माण झाले पाहिजे, या आकांक्षेवरच त्यांची नाटके उभी आहेत.

नमूद करण्यासारखी एक बाब म्हणजे गज्वींची नाटके, चांगल्या नाट्यकृतींना केवळ विचारांचा बेस असल्यामुळे दिग्दर्शकांना आवडली नाहीत म्हणून ती नाकारली गेली. हा सांस्कृतिक राजकारणाचा भाग आहे. इथल्या मानसिकतेचा तो परिणाम आहे. नाटकात शेवटी विजयी होणारा माणूस 'धर्म' मानणारा असला पाहिजे अशी ही मानसिकता! गज्वींना तर धर्माने नागवलेल्या माणसाच्या जगण्याचं व्याकरण समजून घेण्यात स्वारस्य! व्यवस्था माणसाला नागवणारी असेल तर व्यवस्थाविरोधी सूर संयत असेल, संतप्त असेल तर उमटणारच! त्याशिवाय नाट्य कसे निर्माण होईल? असे नाट्य उभे करण्यात गज्वींची हयात गेली. पराभुतांची वेदना बुद्धाच्या करुणेने त्यांना कवेत घ्यावीशी वाटते. म्हणून ते व्यवस्थेच्या शोषकवृत्तीवर, अनीती आणि भ्रष्टपणावर नाट्यांकुश उगारतात. लोकल आणि ग्लोबल नीतीवर आसूड ओढतात. आजच्या जागतिकीकरणाच्या काळात महासत्तेने छोट्यामोठ्या सर्वच राष्ट्रांच्या मुसक्या आवळल्या आहेत. महासत्तेच्या धोरणाच्या विरोधात जाणाऱ्या राष्ट्रांना धडा शिकविणे तिला सहजसाध्य असते. समज देणे, दंडेली करणे किंवा मिंधे करून आवाज बंद करणे ही महासत्तेची राजकीय अर्थ-अनीती असते. अशा राजकारणाचा वेध घेण्याची गज्वींची धडपड वाखाणण्याजोगी आहे. नेटाने एखाद्या ज्वलंत समस्येला भिडायचे आणि प्रत्येक कृतीमागील, वृत्तीमागील कार्यकारणभाव शोधण्यासाठी बुद्धिची कसोटी लावायची, असा त्यांचा खाक्या असतो. सदसद्विवेकबुद्धीवर विश्वास ठेवूनच त्यांचे हे सारे उद्योग सुरू असतात. कारण ते ज्ञानसंस्कृतीचे उपासक आहेत. ज्ञान म्हणजे बोधी. ही संस्कृती बुद्धाने विकसित केली आहे. त्याच आधारे बोधी कला आणि संस्कृतीचा वेध गज्वींनी घेतला आहे. आपली मुळं शोधताना स्वानुभवाकडून पूर्वजानुभवापर्यंत ते पोहोचतात. बोधी कला आणि संस्कृतीचा इतिहास पुरावे देत देत तो अधिक वाचनीय कसा होईल याकडे अधिक लक्ष पुरवितात. कला ही कलेसाठीही नसते आणि जीवनासाठीही नसते, तर ती असते ज्ञानासाठी. ज्ञानात्मक कलाच कलेची नि जीवनाची वृद्धी करीत असते, अशी गज्वींची ठाम भूमिका आहे. अशी भूमिका असणाऱ्याची दखल साहित्य परिषदेला घ्यावीशी वाटणे ही बाब स्वागतार्ह आहे.

गज्वींची बोधी नाट्य चळवळ गेल्या पंधरा-सोळा वर्षांपासून सुरू आहे. आजवरच्या काळात पंचवीसपेक्षा जास्त कार्यशाळा आयोजित केल्या. त्यातून काही महत्त्वाचे नाटककार आणि नाट्यकृती हाताशी लागल्या. बोधीतर्फे दरवर्षी नाट्यमहोत्सवाचे आयोजनही केले जाते. अलीकडेच बोधीने एक नवा उपक्रम राबविला. अजिंठा लेण्या पाहून त्यांचा अभ्यास करून एकाच कलाकृतीवर चार वेगवेगळे आविष्कार, हा अभिनव उपक्रम म्हणता येईल. या नाट्यकृतींचे सादरीकरणही झाले. बोधीचे काम अखंडपणे न खचता, न डगमगता, प्रसंगी पदरमोड करून 'शो मस्ट गो ऑन' या न्यायाने सुरू आहे. कदाचित यासाठीच साहित्य परिषदेने गज्वींचा गौरव केला असावा. त्यासाठी गज्वींचे अभिनंदन आणि पुढील प्रवासासाठी शुभेच्छा!

●

डॉ. महेंद्र भवरे
चलभाष : ९९२०७८९३८५
mmbhaware@gmail.com



अनुक्रमणिका



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद



लेख

नीलिमा गुंडी



# नव्वदोत्तर बदलते सामाजिक संदर्भ आणि स्त्रीलिखित कविता

नव्वदोत्तर काळात जागतिकीकरण, उदारीकरण या धोरणामुळे आपल्याकडे अनेक सामाजिक संदर्भ बदलले. या कालखंडात स्त्रीवादी जाणिवांबरोबरच समकालीन सामाजिक संदर्भांचे भान व्यक्त करणारी कविताही मराठी कवयित्रींकडून लिहिली गेली. बदलत्या सामाजिक वास्तवाला वेगवेगळ्या प्रकारे वेगवेगळ्या पातळीवर या कवितेने प्रतिसाद दिला. या अभिव्यक्तीवर सविस्तर भाष्य करणारा ज्येष्ठ कवयित्री-समीक्षक डॉ. नीलिमा गुंडी यांचा लेख.



मराठीतील आधुनिक स्त्रीकाव्याचा प्रवाह दीडशे वर्षांपूर्वीपासून अस्तित्वात आहे. द्रष्टे समाजसुधारक म. फुले यांच्या पत्नी सावित्रीबाई फुले यांच्या 'काव्यफुले' (१८५४) या संग्रहात शिक्षणाचे महत्त्व अधोरेखित केलेले दिसते. स्त्रीशिक्षण हा स्त्रीच्या साहित्यनिर्मितीसाठीचा आरंभबिंदू होता, त्यामुळे स्त्रीशिक्षणाच्या प्रसाराबरोबर विसाव्या शतकात कवयित्रींची संख्याही वाढलेली दिसते. सुरुवातीच्या काळातील स्त्रीकाव्यामागे मुख्यतः सौंदर्यवादी प्रेरणा आढळतात. १९७५ नंतर स्त्रीकाव्य वास्तवाभिमुख होत गेले. स्त्रीमुक्ती चळवळीमुळे बदललेले सांस्कृतिक पर्यावरण त्यासाठी प्रेरणादायी ठरले. त्यामुळे लिंगभावनिरपेक्षता-स्त्रीपुरुष समता या मूल्याला प्राधान्य देत पुरुषसत्ताक व्यवस्थेवर भाष्य करणारी स्त्रीवादी कविता लिहिली जाऊ लागली. त्याच वेळी आजही पारंपरिक स्वरूपाची स्त्रीकेंद्री कविताही लिहिली जात आहे. तरीही नव्वदोत्तर कालखंडात स्त्रीवादी जाणिवांबरोबरच समकालीन सामाजिक संदर्भांचे भान व्यक्त करणारी कविताही लिहिली जात आहे. तिचा विचार होणे अगत्याचे आहे.

**बदलते सामाजिक संदर्भ**

नव्वदोत्तर बदलते सामाजिक संदर्भ 'जागतिकीकरण' या संज्ञेतून लक्षात येतात. १९९० नंतर जागतिकीकरण, खासगीकरण आणि उदारीकरण या संज्ञांचे प्राबल्य जाणवू लागले. १९९० नंतर दळणवळणाची आणि संज्ञापनाची गतिमान साधने निर्माण झाली. १९९४ मध्ये भारताने गॅट करारावर स्वाक्षरी करून मुक्त अर्थव्यवस्था स्वीकारली. याला तंत्रवैज्ञानिक प्रगतीची जोड मिळाल्यामुळे जग जवळ आल्याचे भासू लागले. 'ग्लोबल व्हिलेज' ही संकल्पना निर्माण झाली. चंगळवाद, भाषा आणि संस्कृतीचे सपाटीकरण, आर्थिक-सामाजिक विषमता, कलेचे बाजारीकरण, आदी प्रवृत्तींमुळे सामाजिक वास्तवावर आघात होऊ लागले. व्यक्तिगत पातळीवर संवादविहीनता, बधिरता, स्थलांतर/ विस्थापन यामुळे येणारे एकटेपण/ तुटलेपण, व्यक्तीचे ग्राहकात रूपांतर करण्याच्या प्रवृत्तीमुळे वाढलेली तृष्णा नि



अनुक्रमणिका



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

मानसिक अस्वस्थता यामुळे सांस्कृतिक पर्यावरणही काही प्रमाणात अस्वस्थ बनत गेले. त्यातच युद्धखोरी, हिंसा, धार्मिक उन्मादातून जन्मलेल्या दंगली (उदा. बाबरी मशीद पाडण्याची घटना इ.), दहशतवादी हल्ले, पर्यावरणऱ्हास अशा विनाशकारी वास्तवाची भर पडली. प्रबोधनकालीन मूल्यांची पीछेहाट होऊ लागली. या बदलांचे चटके काही कवयित्रींना जाणवलेले दिसतात. प्रस्तुत लेखात व्यक्तिकेंद्री लेखनपद्धती न अनुसरता निवडक उदाहरणांच्या द्वारे आशयसूत्रांच्या अंगाने मांडणी केली आहे.

**'ग्लोबल-लोकल' संघर्ष**

जागतिकीकरणामुळे निर्माण झालेली बाजारकेंद्री संस्कृती, भौतिक सुखाची अमर्याद ओढ, जाहिरातींचे संमोहन, आभासी वास्तवाची मोहीम यांचे प्रखर भान काही कवयित्रींनी काव्यात्म स्वरूपात व्यक्त केले आहे. त्यांचे हे भान केवळ वास्तवाशी निगडित नवी प्रतिमासृष्टी अंगीकारण्यापुरतेच मर्यादित नाही. प्रज्ञा दया पवार यांच्या काही कविता येथे आठवतात. 'मॉलने ओसंडून गच्च वाहणाऱ्या', '59 People like this', 'वाचवता येत नाहीत' (दृश्यांचा ढोबळ समुद्र, २०१३), 'ग्लोबल व्हिलेज' (उत्कट जीवघेण्या धगीवर, २००२), 'तरण्याताठ्या साक्षात्कारात ग्लोबल तिठ्यावर' (मी भिडवू पाहतोय सामग्राशी डोळा, २००७) या त्यांच्या कविता विशेष लक्ष वेधून घेतात. 'आरपार लयीत प्राणांतिक' (२००९) या काव्यात विठाबाई भाऊ मांग-नारायणगावकर या लावणीसम्राज्ञीचे जगणे शब्दबद्ध करतानाही कवयित्री 'नवभांडवलशाहीचा कराल वरवंटा आणि त्याखाली लैंगिक शोषणाने भरडल्या जाणाऱ्या तळागाळातल्या कलावंत 'स्त्रिया' हे समकालीन वास्तवही लक्षात आणून देते. त्यांची कविता 'रांगेत उभंच नसलेलं बाईमाणूस' केंद्रस्थानी ठेवते. त्यामुळे 'ग्लोबल तिठ्यावर। आज्जी विकत बसलीय। विळी न् कोयता', 'हा सुबत्तेचा ग्लोबल फुफाटा उडतोय। भैयालाल भोतमांगेच्या। ठार दगड झालेल्या डोळ्यांत।'[१] यासारख्या त्यांच्या ओळी ग्लोबल आणि लोकल यांच्यातील दरी दाखवून देतात. दलितांवरील अत्याचाराच्या घटनांची आठवण करून देतात. त्यांची कविता स्त्रीच्या परिप्रेक्ष्यातून वास्तवाचा चेहरा शब्दांकित करते तेव्हा त्यातील चीड धारदारपणे व्यक्त होते, ती अशी :

'सोपंच अस्तंय हे। एक तर मोनालिसात रूपांतर करणं। नाही तर बाजारपेठेच्या मुक्त वाऱ्यावर। पाशवी रक्तानं भिजलेली। आमची अंतर्वस्त्रं। निर्ममपणे सुकायला टाकणं।'[२] या शब्दांतून जागतिकीकरणाचा पुरुषसत्ताक चेहरा नेमका उघड होतो. (हल्ली आंतरराष्ट्रीय क्रिकेटस्पर्धांमध्ये वापरल्या जाणाऱ्या चिअरगर्ल्स येथे आठवतात.)

नीरजा यांची कविताही बदलत्या सामाजिक वास्तवावर भेदक भाष्य करते. त्यांच्या 'ग्लोबल सर्वार्थानं', 'मॉल्स', 'इमोशनल नाय व्हायचं यार', 'ग्लोबल कविता १ आणि २. (निरर्थकाचे पक्षी २०१०) या कविता या दृष्टीने महत्त्वाच्या आहेत. आभासी वास्तवाची मोहिनी लक्षात आणून देताना त्या ग्लोबल पुरुषाविषयीचे 'रोमँटिक' स्वप्न उपरोधाने रेखाटतात. बाजारकेंद्री व्यवस्थेत माणसांना आलेले वस्तुरूप कवयित्रीला अस्वस्थ करते ते असे :

*'शॉपिंग मॉल्स वाहताहेत ओसंडून,*
*माणसं चकचकीत फरशीसारखी*
*घसरंगळताहेत स्वतःवरूनच*
*डिस्काउंटची पाटी गळ्यात अडकवून*
*हातोहात विकली जाताहेत माणसं'*[३]

जागतिकीकरणाविषयीचा राग आणि निराशा एकत्रितपणे व्यक्त करताना त्या लिहितात :

*'दुःखाच्या पापड चिकोड्या मांडून ओळीनं*
*ह्या ग्लोबल गावात*
*वाळवणं करायची आता*
*आणि वाट पाहायची ओल हरवण्याची*
*बाईच्या स्तनाचीही'*[४]

त्यांच्या या ओळी भयावह भविष्याचा इशारा देत आहेत.

मॉल्स संस्कृतीला या चंगळवादाच्या प्रभावकाळात मिळालेले श्रद्धेय (!) रूप सिसिलिया कार्व्हालो यांनाही खटकते. त्या लिहितात :

*'मंदिरातल्या गाभाऱ्यातला प्रकाश*
*मॉलमधील प्रकाशापेक्षा असतो फिका*
*सर्व वस्तू लखलख दिसतात त्यांना...*
*झिरझिरीत वस्त्रातून दिसणाऱ्या अवयवांसारख्या*
*त्यावरच असते त्यांची श्रद्धा'*[५]

वासना चेतवणारे मॉल्सचे रूप जगण्याचा पोतच कसा बदलून टाकत आहे याविषयीचा उपरोध या कवितेतून व्यक्त झाला आहे. 'मॉलसमोरून', 'पृथ्वीच्या इलाजासाठी', 'रॅम्पवर चालणाऱ्या या मुली' ( माणूस उकरून काढावा लागतोय. २०१५) इत्यादी कवितांमधून कवयित्रीने समकालीन वास्तवाचा भेदक शब्दांत छेद घेतला आहे.

नीलिमा गुंडी यांनीही 'सीलबंद कविता', 'भर दुपारी रस्त्यावर', 'माती, ती तर', 'हवा आहे खुलेपणा,' 'आईपणाच्या सोळाही कळा' (जगण्याच्या कोलाहलात, २०१२) आदी कवितांमधून वास्तवावर भाष्य केले आहे. या बदलाच्या रेट्याकडे पाहणाऱ्या सर्वसामान्य माणसाची भयचकित अवस्था त्यांनी सुदामा या पुराणप्रतिमेद्वारे 'सीलबंद कविता'मध्ये रेखाटली आहे. जाहिरातींचे वाढते संमोहन (उदा. 'दिल माँगे मोर'सारखी जाहिरात) आणि चंगळवादाच्या रेट्याखाली येणारा तरुणवर्ग यामुळे कवयित्री अस्वस्थ होते आणि लिहिते :



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

*'थंडगार पेप्सीचा घोट रिचवताना*
*तहानलेल्याच राहिलेल्या मुला,*
*तुला पाहताना रोज*
*पराभूत होतात माझ्यातल्या*
*आईपणाच्या सोळाही कळा!'*[७]

याही कवितेत पिठात कालवून दिलेल्या, पाण्याने तहान शमलेल्या गरीब अश्वत्थाम्याची पुराणप्रतिमा कवयित्रीने विरोधासाठी योजली आहे. भौतिकदृष्ट्या संपन्न तरुणाची वाढती तृषा त्यामुळे अधोरेखित होते.

**ग्रामीण वास्तवाचे चित्रण**

नीलम माणगावे यांचा 'उद्ध्वस्तायन'(२००८) हा संपूर्ण संग्रहच ग्रामीण स्तरावर जागतिकीकरणामुळे होणारे दुष्परिणाम चित्रित करतो. त्यातील 'भांडवली ज्ञान', 'महासर्पाची वळवळ', 'सपाटीकरण', 'पटावरची सोंगटी', 'इण्डिया आणि भारत', 'सुपात आणि जात्यात', 'पाटा-वरवंटा', 'सावधान', 'जग जवळ आलं, पण...' या कविता विशेष उल्लेखनीय आहेत. जागतिकीकरणामागील धूर्त राजकारण त्या उघड करतात, गावपातळीवरचा विनाश समोर ठेवतात. स्त्रियांसाठीच्या राखीव जागा, आभासी वास्तवाने बुद्धिभ्रष्ट झालेला शेतकरी, मॉल्सची वारुळे, जाहिरातीत वापरली गेलेली स्त्रीप्रतिमा, अशा वास्तव घटकांचे चित्रण त्या थेट शब्दांत करतात. त्यांची कविता बाजारपेठेमुळे निर्माण झालेले स्त्रीवादातील अंतर्विरोधही लक्षात आणून देते. त्या लिहितात :

*'सोन्याचं अंडं देणाऱ्या कोंबडीपेक्षाही। ती किमती झालीय। या जागतिकीकरणात। आता पुन्हा नव्याने। जपलं जाईल तिला। भागभांडवलाच्या रूपात!'*[८]

येथे 'सरोगसी'द्वारे गरीब स्त्रीचे होणारे शोषण, तंत्रवैज्ञानिक प्रगती(!)मुळे फोफावलेली बाजारपेठी संस्कृती आणि स्त्रीची निव्वळ शारीरवस्तू म्हणून होणारी गणना आदी प्रवृत्तींमुळे वाटणारी अस्वस्थता उपरोधाने व्यक्त झाली आहे.

संध्या रंगारी यांच्या 'संध्यारंग' (२०१०)मधील 'कविता चळवळीच्या' या गटातील अनेक कविता समकालीन समस्यांविषयीचे कवयित्रीचे मार्मिक आकलन व्यक्त करतात. त्यातून समाजमनाची बधिरता आणि राजकीय मूल्यभ्रष्टता नेमकेपणे व्यक्त होते. त्यांच्या एका कवितेत शेतकऱ्याचा पोर म्हणतो, 'सेझची क्रेझ आणून आमचं सरण रचू नका। खाऊजा खाऊजा म्हणत। आम्हालाच खाऊ नका।'[९] या कविताही समकालीन प्रश्नांकडे थेटपणे अंगुलिनिर्देश करणाऱ्या आहेत.

कल्पना दुधाळ या शेतकरी कवयित्रीचा 'सीझर कर म्हणतेय माती' (२०१०) हा संग्रहही जागतिकीकरणाचा गावपातळीवर होणारा घणाघाती आघात नेमका टिपतो. शेतकऱ्यांच्या आत्महत्येमागची कारणपरंपरा त्यातून लक्षात येते. 'कणसांचे मरणोत्सव'मध्ये धान्यापासून मद्यार्कनिर्मिती हा ज्वलंत वादविषय येतो. 'सीझर कर म्हणतेय माती', 'लँडलाइन', 'झलक दिखला जाऽऽ' अशा त्यांच्या अनेक कविता लहान शेतकऱ्यांची परवड सांगताना चंगळवादामुळे भौतिक सुखाची चढलेली नशाही परखडपणे मांडतात. 'वाटण्या' या कवितेत त्या प्रश्न विचारतात :

*'मातीतल्या माणसाचं माणूसपण*
*भिरूड लागून नष्ट होताना*
*जग मुठीत घेऊन*
*एक्स्प्रेस युवरसेल्फ...*
*कनेक्टिंग पीपल...म्हणायचं?'*[१०]

जागतिकीकरणानंतरचे शहरी आणि ग्रामीण वास्तव अनेकजणींनी चित्रित केले आहे. काहींचा येथे उदाहरणादाखल नामनिर्देश करीत आहे :

१) अश्विनी धोंगडे - 'बाई डॉट कॉम' (२०१०), २) अंजली कुलकर्णी- 'बदलत गेलेली सही' (२००९), ३) मलिका अमरशेख- 'महानगर' (२०००), ४) प्रतिमा इंगोले- 'उदयसोहळा' (२००५), ५) संगीता बर्वे- 'दिवसाच्या वाटेवरून' (२००७), ६) सुनीता झाडे - 'आत्ममग्न'(२०१०), ७) मीनाक्षी पाटील-'इट इज इन युअर डीएनए' (२००९), ८) मनीषा दीक्षित- 'बर्फाचे दिवस आणि कविता' (२०१०), ९) छाया कोरेगावकर- 'एक अवकाश माझंही' (२०१०), १०) अनघा तांबोळी- 'उजेडाचे कवडसे' (२०१३), इत्यादी.

**वास्तवाचे हिंस्र रूप**

धार्मिक मूलतत्त्ववादाचा वाढता प्रभाव, दंगली, दहशतवादी हल्ले, बलात्काराच्या घटना यामुळे समकालीन वास्तव अधिकाधिक हिंस्र बनत आहे. अनेक कवयित्रींना याची जाणीव दिसते. मलिका अमरशेख यांच्या 'माणूसपणाचे भिंग बदलल्यावर' (२००७) या संग्रहात या आशयसूत्राशी निगडित अनेक कविता आहेत. 'प्रगत देशातली प्रगत मरणं', 'प्रिय मित्रा', 'मला हवेचा आवाज ऐकू येत नाही', 'शहरात आजकाल' अशा त्यांच्या अनेक कविता हिंसेविषयीची कवयित्रीची चीड व्यक्त करतात. कवयित्री लिहिते :

*'युद्धबिद्ध-दहशतवाद-जमीन-वसाहतवाद*
*स्वातंत्र्य-कर्म*
*हिंसेला दिलेली छान गोड नावं*
*आम्ही करतोहोत हिंसेचं बारसं*
*हिंसाच आमची माता*
*हिंसाच आमचा पिता'*[११]

माणसाची हिंसक वृत्ती, दांभिक वृत्ती, नैसर्गिक पर्यावरणाशी त्यांनी घेतलेली फारकत यावर त्यांची कविता उपरोधिक भाष्य करते.

नीरजा यांच्या 'निरर्थकाचे पक्षी'मधील कविताही हिंसेच्या निषेधाचा सूर व्यक्त करतात. त्यांच्या 'खेळकर', 'देव हरवलेत' आदी कविता येथे आठवतात. एकमेकांना जिवंत जाळण्याचा खेळ खेळू इच्छिणारी मुले त्या कवितेत रेखाटतात. त्यातून उपरोधाचे अस्त्र उगारले जाते. त्याच वेळी त्यांच्यातील स्त्रीमन मुलाला करुणेचे दूध पाजू इच्छिते. स्त्रीची कविता ही



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

'पांढऱ्या शाईने' (दुधाने) लिहिलेली कविता असते, याची आठवण येथे होते.

संगीता बर्वे यांची 'अम्मा शेख' (दिवसाच्या वाटेवरून, २००७) ही कवितादेखील अशाच सुरातील अनुभव व्यक्त करते. हिंदू-मुस्लिम दंगलीच्या पार्श्वभूमीवर अम्मा शेखचा जीवनानुभव हा विश्वास, करुणा नि मान व प्रेम यांचा प्रत्यय देतो तो असा :

*'तेव्हा अम्माला ठाऊक असते*
*की तिच्या शिरेतले रक्त नाही हिरवे*
*नि डॉक्टरणीच्या शिरेतले नाही भगवे'*[१]

सिसिलिया कार्व्हालो यांनीही युद्धामध्ये स्त्री हीच कशी हिंसेची शिकार बनते याकडे लक्ष वेधले आहे. त्यांच्या 'माणुसकीच्या खोपा', 'एकाएकी', 'तडफड' (दारातल्या रांगोळीचे रंग, २००७) या कविता महत्त्वाच्या आहेत. भोवतालच्या भयप्रद वास्तवामुळे दारातल्या रांगोळीचे रंग उडून जात असल्याची खंत कवयित्रीने सातत्याने व्यक्त केली आहे.

प्रज्ञा दया पवार (प्रज्ञा लोखंडे) यांच्या 'अर्वाचीन आरण', 'पीस अँड हार्मनी' आदी कविता हिंसा, बलात्कार या घटनांवर प्रखर प्रकाशझोत टाकून त्यामागील सांस्कृतिक व्यवस्थेच्या व्यूहनीतीला लक्ष्य करतात (मी भिडवू पाहतेय समग्राशी डोळा, २००७). त्या लिहितात :

*'पीस अँड हार्मनी*
*अत्यंत हिंसक आहेत हे शब्द*
*टायमर लावलेले!'*[२]

या कवयित्रीलाही 'अपार उरलीसुरली करुणा' वाचवणारी कविता लिहायची आहे.

हिंसेचे एक वेगळेच रूप नजीकच्या काळात स्पष्ट झाले. ते रूप म्हणजे स्त्रीभ्रूणहत्या हे होय. स्त्रीचे अदृश्यीकरण करण्याचा हा प्रयत्न निंदनीय आहे. शैला लोहिया, अश्विनी धोंगडे, प्रिया धारूरकर, वृषाली किन्हाळकर, छाया कोरेगावकर आदी अनेक कवयित्रींना या विषयाला कवितेत स्थान दिले आहे आणि समाजातील या प्रवृत्तीचा त्यात निषेध नोंदवला आहे.

स्त्रीच्या परिप्रेक्ष्यातून वर्चस्ववादी प्रेम कसे हिंसक ठरू शकते याचे मार्मिक चित्रण कविता महाजन यांच्या 'ओंजळ या कवितेतून केले गेले आहे. प्रेयसीचा चेहरा ओंजळीत धरून 'ते माझे फूल आहे', असे आक्रमक अधिकाराने म्हणणाऱ्या प्रियकराबाबत कवयित्री म्हणते,

*'तुला कदाचित माहीतही नसेल*
*अशीही चिरडून जातात फुले'*[३]

स्त्रीच्या वाट्याला कुटुंबापासून सार्वजनिक क्षेत्रापर्यंत कोठेही हिंसेचा अनुभव कसा येऊ शकतो याची उदाहरणे अलीकडच्या बातम्यांमधून वाचायला मिळतात. अशा घटनांचे चित्रण करणाऱ्या कवयित्री अनेक आहेत. अंजली कुलकर्णी, आसावरी काकडे, कविता महाजन, रजनी परुळेकर, हिरा बनसोडे, उषा मेहता, सुनीता झाडे, ऊर्मिला चाकूरकर, ज्योती लांजेवार, आदी अनेकजणींनी वेगवेगळ्या कोनांतून हिंसेचे चित्रण केले आहे. आजच्या स्त्रीकाव्यात द्रौपदीचे वस्त्रहरण ही घटना केवळ पुराणप्रतिमा न राहता सनातन क्रौर्याची प्रतिमा ठरली आहे.

हिंसेचे वाढते प्रमाण आपल्या प्रशासन व्यवस्थेशीही निगडित प्रश्न निर्माण करते. पोलिस खात्यात काम करणारी कवयित्री बालिका ज्ञानदेव म्हणूनच 'मॅगझिनीतून सुटतेय गोळी' (२०१४) असा पवित्रा घेऊन कविता लिहिते आणि हिंसा, भ्रष्टता आदींचे धीटपणे दर्शन घडवत सामाजिक अधःपतनाचे (वाचकांना अंतर्मुख व्हायला भाग पाडणारे) चित्र समोर ठेवते. तिच्या संग्रहातील 'बाई म्हणून जगताना' या गटातील कविता म्हणजे स्त्रीच्या होणाऱ्या हिंसेच्या विविध तऱ्हांचे नमुने आहेत. त्यातला हा एक कौटुंबिक हिंसेचा नमुना :

*'कधी जर का विचारला प्रश्न तुला*
*यायचास अंगावर सारं बळ एकटवून*
*उपटायचास माझे केस, आपटायचास डोके भिंतीवर*
*आणि द्यायचास आकार त्याला*
*ऐरणीवर सापडलेल्या लोखंडासारखा'*[४]

परंपरेच्या दबावाखाली शतकानुशतके मौनाच्या कठोर कवचाखाली दबलेले हे हुंदके आत शब्दबद्ध होत आहेत हे महत्त्वाचे आहे.

**सांस्कृतिक पुनर्घटनेच्या दिशेने**

आजच्या काही कवयित्री समकालीन वास्तवाचे केवळ वर्णन किंवा प्रक्षेपण करून थांबत नाहीत. त्यांचे वास्तवाचे वाचन सूक्ष्म आहे. त्यामुळे वास्तवाला नव्याने विधायक स्वरूपात आकार देण्यासाठी भाषिक आणि सांस्कृतिक स्तरावर कोणते नवे संवेदन गरजेचे आहे, त्या दिशेबाबतचे संसूचनही त्यांच्या कवितांमध्ये आढळते.

भाषिक संवेदन हे यात अग्रभागी येते, कारण भाषा ही संस्कृतीचा मूलाधार आहे. त्यामुळे आजची स्त्रीकविता नव्या परिभाषिताच्या शोधात दिसते. नवी भाषा घडवणे, जुन्या भाषेची गरजेनुसार फेरमांडणी करणे यांची अनुभूती प्रज्ञा दया पवार, नीरजा, कविता महाजन, मलिका अमरशेख आदी कवयित्री व्यक्त करताना दिसतात. प्रज्ञा पवार यांचा भाषा कुटण्याचा पवित्रा, नीरजा यांचा टोकदार शब्दांचा शोध, मलिका अमरशेख यांचा नवे शब्द रांधण्याचा मार्ग, सुमती लांडे यांचे 'निबीड मौन' (वाहते अंतर, २००२) हे सारे मार्ग भाषिक नवसर्जनाला चालना देतात. इतकेच नव्हे, तर काही कवयित्री स्त्रीच्या मौनाविषयीचे तिच्या दुबळेपणाचे पारंपरिक रचित प्रसंगी बदलू पाहतात. कविता महाजन या मौन म्हणजे 'तीक्ष्ण तरबेज शब्दांविरुद्धची किंकाळी' असे मानतात. कविता या साहित्यप्रकाराकडेही त्या खूप खोल दृढ नाते बाळगून पाहतात. कविता महाजन (मृगजळीचा मासा, २००८) लिहितात :

*'संवेदनांच्या रक्तमांसावर पोसून*
*संभ्रमाच्या काळोखातून*
*नव्यानं जन्मू शकतो आपण*



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

*उघडेवाघडे मुक्तमोकळे*
*उच्चारू शकतो पहिला हुंकार खुल्या वातावरणात*
*अशी जागा असते कविता'*[१६]

सांस्कृतिक पुनर्घटनामध्ये मूल्यसंकल्पनांची फेरतपासणीदेखील महत्त्वाची ठरते. विशेषतः मूल्यांच्या पडझडीच्या काळात काही कवयित्री स्वातंत्र्य, समता, न्याय यांच्या बाजूने बोलताना दिसतात. मुख्य म्हणजे 'स्वातंत्र्य' या संकल्पनेत गृहीत धरल्या जाणाऱ्या अनेक अर्थछटा त्या तपासून पाहताना दिसतात. अनुराधा पाटील 'पोरी' या कवितेत (वाळूच्या पात्रात मांडलेला खेळ, २००५) मुलीच्या भविष्याबाबत स्वतःशीच संवाद साधताना म्हणतात :

*'तिला करता येईल*
*टकमक टोकावर उभं राहून*
*हाती न येणाऱ्या*
*झगमगत्या नक्षत्रावर*
*स्वतःला उधळून प्रेम?'*[१७]

येथे परंपरेकडे पाठ फिरवून स्वतःशी इमान राखून संघर्षाला तोंड देत जगण्याचे स्वातंत्र्य अभिप्रेत आहे. अनुपमा उजगरे यांच्या 'सांगी' (२००३) या संग्रहाच्या शीर्षकाच्या कवितेत आजी सांगत राहते :

'बाई आहेस तू, परी नाहीस' (परीचा तोल देव सांभाळतो, असा समज आहे.) तरीही परीसारखी 'मी चवड्यावर चालत राहिले। माझा तोल मी सांभाळत राहिले।'[१८] अशी कवयित्रींची कणखर स्वातंत्र्यऊर्मी आहे. येथे परीची व्यक्तिगत मुक्त (रोमँटिक) अशी स्वातंत्र्यकल्पना वास्तवात अंगीकारणे धोक्याचे आहे, ही जाणीव ठेवून, त्यातली जोखीम ओळखून स्वातंत्र्य जबाबदारीने निभावले आहे.

वैयक्तिक स्वातंत्र्याला जबाबदार (सामाजिक उत्तरदायित्व मानणाऱ्या) स्वातंत्र्याची जोड असावी लागते, हे मीनाक्षी पाटील यांनीही आपल्या दीर्घकवितेत मार्मिकपणे लक्षात आणून दिले आहे. त्या 'इट इज इन युवर डीएनए' या संग्रहात त्याच शीर्षकाच्या कवितेत लिहितात :

*'अस्तित्वाच्या या लढाईत बाईनं*
*का म्हणून मागं राहायचं*
*स्वातंत्र्याचा मिनिस्कर्ट*
*अन् अस्मितेची चोळी घालून'*[१९]

म्हणजे स्वातंत्र्य, अस्मिता ही मूल्ये केवळ व्यक्तिगत पातळीवर अनुभवणे पुरेसे नाही. भल्यामोठ्या बाजारपेठांविरुद्धच्या स्त्रीदेहाच्या विकृतिपूर्ण वापराबाबतच्या लढाईतही बाईने मागे राहता कामा नये, हा याचा भावार्थ आहे. प्रज्ञा दया पवार यांची 'स्वातंत्र्याचं ट्रायल घेऊनसुद्धा' ही कवितादेखील स्वातंत्र्य या मूल्याचा अपेक्षित आणि प्रत्यक्षात अनुभवाला येणारा अर्थ यातील विसंगती स्त्रीच्या दृष्टिकोनातून रूपकाद्वारे लक्षात आणून देते. 'बेतलेले' स्वातंत्र्य आणि उत्स्फूर्त ऊर्मीतून उमलणारे स्वातंत्र्य यातील अंतरही त्यातून सूचित होते. उदा. -

*'स्वातंत्र्याचं ट्रायल घेऊनसुद्धा*
*नीट बसलीच नाहीत आयुष्यं*
*आमच्या शरीराभोवती फिट्ट'*[२०] ही त्यांची तक्रार मूल्यांच्या रूढ अर्थाच्या फेरतपासणीची गरज लक्षात आणून देते. तर, सिसिलिया कार्व्हालो या स्वतःलाच धारेवर धरतात नि लिहितात :

*'मी नाही ऐकला आवाज तेव्हाचा।*
*खळखळा बेड्या तुटल्याचा।*
*मी नाही ऐकला आवाज आजचा।*
*दंगलीच्या चित्तेवर लाख बांगडी फुटल्याचा।*
*हे कसले स्वातंत्र्य मी उपभोगतेय।*
*अंगाची लाही होण्याचे?।*
*जिवाची काहिली होण्याचे?।'*[२१]

मूल्यसंकल्पनांची फेरतपासणी करताना धर्मसंस्कृतीतील मिथकांचेही प्रसंगी पुनर्वाचन करावे लागते. आजच्या काही कवयित्री- उदा. नीरजा, सिसिलिया कार्व्हालो, विजया जहागिरदार, हेमा लेले, प्रज्ञा दया पवार, सुहासिनी इर्लेकर, शैला लोहिया, मीरा आदी याप्रकारे मिथकांकडे नव्या दृष्टीने पाहतात. लोकसाहित्याच्या अभ्यासामुळे मिथकांच्या निर्मितीमागची समूहमनाची भाबडी प्रवृत्ती जाणणाऱ्या कवयित्री अरुणा ढेरे (निळ्या पारदर्शक अंधारात, २००४) बदलत्या विवेकनिष्ठ युगात परमेश्वराला प्रश्न करतात :

*'माझ्या निळ्यासावळ्या अंधाराच्या देवा,*
*या नव्या दिवसाच्या कल्लोळात तुला कुठला ठाय?*
*अठ्ठावीस युगे उभा राहिलास जिच्यावर निःशंक*
*ती वाट गेली भुगा होऊन,*
*आता कुठे टेकशील पाय?'*[२१]

अशा मूल्यसंक्रमणाच्या काळात संघर्ष अटळ असतो. अशा वेळी आदर्श प्रतिमाने पुन्हा नव्याने लोकांसमोर आणणे गरजेचे असते. मंदा कदम यांचे 'सखी सावित्री' (२००७) हे खंडकाव्य त्या दृष्टीने महत्त्वाचे ठरते. स्त्रीपुरुष-समता, सामाजिक बांधिलकी आणि न्याय यांची लोकमानसात नव्याने प्रतिष्ठापना करण्यासाठी हे काव्य मार्गदर्शक ठरते.

स्त्रीलिखित कवितांमध्ये स्त्रीत्वाचा शोध हा घटक महत्त्वाचा ठरतो. विशेषतः आजच्या बाजारपेठीय संस्कृतीत स्त्रीला स्वतःचे सत्त्वभान येणे गरजेचे आहे. अंजली कुलकर्णी यांनी 'एक्सक्लुझिव्ह चीज' (मिळून साऱ्याजणी, मार्च २०१५) या कवितेत नवऱ्याच्या नजरेतून बायको ही कशी कधी कधी मिरवायची 'चीजवस्तू' असते, हे उपरोधाने व्यक्त केले आहे. कवयित्रीला त्यात शेवटी आलेले आत्मभान महत्वाचे आहे. प्रज्ञा दया पवार यांची 'फोटो' (दृश्यांचा ढोबळ समुद्र,२०१३) ही कविता, कवयित्री मीरा यांची 'सरहद्द' ही कविता, रंजन कंधारकरांची 'आत' (स्वधा, २००६) ही कविता, आसावरी काकडे यांचा 'स्त्री असण्याचा अर्थ' (२००६) हा संग्रह ही काही उदाहरणे म्हणून येथे नोंदवते.

अश्विनी धोंगडे यांची 'मी पाण्याच्या जातीची'



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

(अपौरुषेय, १९९८) ही कविता स्त्रीत्वाचे आंतरिक सामर्थ्य चपखल प्रतिमेद्वारे लक्षात आणून देते. उदा.

*'पाण्यात पहा, तुमचेच प्रतिबिंब दिसेल*
*सर्वांगावर घ्या पाणी, अलिप्त असेल*
*मुठीत ठेवा, मूठ रिती असेल*
*कुमारी मी युगायुगाची, मी पाण्याच्या जातीची'*[२२]

आजच्या काळात स्त्रीने केवळ देहमानाशीच स्वतःला कोंडून घेणे पुरेसे नाही, ही यामागची जाणीव महत्त्वाची आहे.

'म्होरकी' (१९९७)च्या उषाकिरण आत्राम या आदिवासी कवयित्रीनेही आपल्या सहकारी मैत्रिणींना पारंपरिक स्त्रीच्या रतिप्रतिमेत जखडून न राहता जागरूक होण्याचे आवाहन केले आहे ते असे :

*'फेकून द्या ते फाटक्या पदराचे बुजगावणे*
*सोडून फेका बंदिस्त माळांचे जखडणे'*[२३]

या अशा कवितांची प्रभावक्षमता मोठी आहे.

मुळात कविता लिहिणे ही एक सांस्कृतिक जबाबदारी आहे, याची जाणीव आज काहीजणींकडे आहे. अनेकप्रकारे नवसंवेदन व्यक्त करणारी ही समकालीन कविता सांस्कृतिक पुर्नघटनाच्या दिशेने वाटचाल करीत आहे. येथे प्रज्ञा लोखंडे (प्रज्ञा दया पवार) यांची 'संस्कृती' (उत्कट जीवघेण्या धगीवर,२००२) ही कविता लक्षात घ्यायला पाहिजे. कवयित्री लिहिते : 'होऊ दे मला। तुझी सर्वांत लाडकी लेक। तुझी सावली नाकारणारी।'[२४] येथे कवयित्रीला 'तुझी सर्वांत लाडकी लेक' असे म्हणताना परंपरेचा आत्मीय स्वीकार अभिप्रेत आहे आणि 'तुझी सावली नाकारणारी' असे म्हणताना परंपरेला दिलेला नकार अभिप्रेत आहे. सांस्कृतिक पुनर्घटनासाठी अशी परंपरेच्या स्वीकाराबाबतची जी डोळस चिकित्सेची प्रक्रिया आवश्यक असते, त्या द्वंद्वात्मक प्रक्रियेचा जिवंत प्रत्यय या कवितेतून येतो.

**समारोप :**

एकंदरीत नव्वदोत्तर स्त्रीलिखित कविता बदलत्या सामाजिक वास्तवाला वेगवेगळ्या प्रकारे, वेगवेगळ्या पातळीवर प्रतिसाद देत आहे. स्त्रीवादी विचारांचा वाढता दाब, हे यामागचे कारण आहे. स्त्रीवाद हा विचारव्यूह केवळ स्त्रीपुरुषसमता या मूल्याच्या रुजवणुकीपुरताच मर्यादित नसून तो स्त्रीच्या परिप्रेक्ष्यातून वास्तवाचे येणारे सर्वंकष भान करण्याचे बळदेखील देतो, याचे प्रत्यंतर या कवितांमधून येते. त्याची नोंद घेणे आवश्यक आहे.

●

**डॉ. नीलिमा गुंडी**
चलभाष : ९८८१०९१९३५
nmgundi@gmail.com

(टीपः मुंबई विद्यापीठाच्या मराठी विभागातर्फे आयोजित राष्ट्रीय चर्चासत्रात (दि. १३ मार्च २०१५) वाचलेला निबंध परिष्कृत स्वरूपात)

**संदर्भसूची-**

१. प्रज्ञा दया पवार, 'लव्ह इन द टाइम ऑफ खैरलांजी.' **दृश्यांचा ठोबळ समुद्र**, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, २०१०, पृ.१-८
२. प्रज्ञा दया पवार, 'चिरव्याकुळ एकाकीपणाच्या होर्डिंग्जवर', रविवार सकाळ, (सप्तरंग), पुणे पृ. ८
३. नीरजा, '**निरर्थकाचे पक्षी**, पॉप्युलर, मुंबई २०१०, पृ. १२१-१२२
४. नीरजा, 'ग्लोबल कविता :२' तत्रैव, पृ.१५४-१५५
५. सिसिलिया कार्व्हालो, 'मॉलसमोरून', **माणूस उकरून काढावा लागतोय**, शब्दालय प्रकाशन, श्रीरामपूर, २०१५, पृ.१२१
६. नीलिमा गुंडी, 'आईपणाच्या सोळाही कळा', '**जगण्याच्या कोलाहलात**, स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे, २०१२, पृ.२१
७. नीलम माणगावे, 'भांडवली ज्ञान', **उद्ध्वस्तायन**, अक्षरदीप प्रकाशन, कोल्हापूर, २००८ पृ. १२-१५
८. संध्या रंगारी, 'कविता चळवळीच्या', '**संध्यारंग**', स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे, २०१०, पृ. १६०-१६१
९. कल्पना दुधाळ, 'वाटण्या', **सीझर कर म्हणतेय माती**, नवसिद्धांत प्रकाशन, नाशिक, २०१०, पृ. ३५-३६
१०. मलिका अमरशेख, 'प्रगत देशातली प्रगत मरणं, '**माणूसपणाचं भिंग बदलल्यावर**, लोकवाङ्मयगृह, मुंबई, २००७, पृ. ८४-८७
११. संगीता बर्वे, 'अम्मा शेख', '**दिवसाच्या वाटेवरून**, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, २००७, पृ. ४७-४८
१२. प्रज्ञा लोखंडे, 'पीस अँड हार्मनी', **मी भिडवू पाहतेय समग्राशी डोळा**, ग्रंथाली, मुंबई, २००७, पृ. ४५-४६
१३. कविता महाजन, 'ओंजळ', **मी माझीच** (रूपांतर- मीना देवल), अक्षरा प्रकाशन, मुंबई, २००३ मध्ये समाविष्ट
१४. बालिका ज्ञानदेव, 'कागदावर उतरू दिली नाही वेदना तू', '**मॅगझिनीतून सुटतेय गोळी**, लोकवाङ्मयगृह, मुंबई, २०१४, १००
१५. कविता महाजन, 'पत्र ३', **मृगजळीचा मासा**, राजहंस, २००८, पृ.१२३-१२४
१६. अनुराधा पाटील, 'पोरी', **वाळूच्या पात्रात मांडलेला खेळ**, तुला प्रकाशन, औरंगाबाद, २००५, पृ. १८-२१
१७. अनुपमा उजगरे, 'सांगी', **सांगी**, स्वरंगनिर्मिती, ठाणे, २००३, पृ.५५
१८. मीनाक्षी पाटील, **इट इज इन युवर डीएनए**, अपिधानंतर आणि पोएट्रीवाला, मुंबई, २००९, पृ. ५९-७९
१९. प्रज्ञा दया पवार, 'स्वातंत्र्याचं ट्रायल घेऊनसुद्धा', **दृश्यांचा ढोबळ समुद्र**, उनि, पृ. ९२-९३
२०. सिसिलिया कार्व्हालो, 'स्वातंत्र्य', **दारातल्या रांगोळीचे रंग**, शलाका प्रकाशन, वसई, २००७, पृ. १०-११
२१. अरुणा ढेरे, 'माझ्या निळ्यासावळ्या अंधाराच्या देवा', **निळ्या पारदर्शक अंधारात**, सुरेश एजन्सी, पुणे, २००४, पृ. ३९
२२. अश्विनी घोंगडे, 'मी पाण्याच्या जातीची', **अपौरुषेय**, श्रीविद्या प्रकाशन, पुणे, १९९८, पृ. ७७-७८
२३. उषाकिरण आत्राम, '**म्होरकी**', गोंडवाना-गोंडी साहित्य परिषद, नागपूर, १९९७, पृ. ३४
२४. प्रज्ञा लोखंडे, 'संस्कृती', **उत्कट जीवघेण्या धगीवर**, लोकवाङ्मयगृह, मुंबई, २००२, पृ. ६३-६४



अनुक्रमणिका

मराठीचा विकासः महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद



# समकालीन कवी

रंगनाथ पठारे



भाजी गणपत कडलग, गुजाबाई धनगरीण, हिराबाई जाफरमियाँ जहागिरदार, कमलाबाई भाऊराव भानुसे, चांगू किसन रणमळे, बाळू पिराजी, छबू, कल्ल्या, शैला, सोन्याबापू, तम्मा, ताई, रोडू, धुरपदा, सरूबाई, न्हाईबाबा, फ्रँकी, सोनी, बहादूर थापा, जॉन, सोमा, नागू, बाळ्या गारुडी, बुवा, मुकी... ही कसली माणसं संतोषने आपल्यासमोर उभी केलीयत? का उभी केलीत? त्यांची आयुष्यं, त्यांचं नेटाने जगणं, जगण्याशी लढणं, जगण्यातून परागंदा होणं यांच्या कहाण्या का सांगतोय संतोष आपल्याला? आपल्याला अस्वस्थ करण्यासाठी? त्यांच्या आपल्या आस्थेच्या दुनियेतून हद्दपार होण्याची आठवण देण्यासाठी? ते आपल्यातलं काय घेऊन गेलेत, आपण काय गमावून बसलो आहोत याचं भान देण्यासाठी? आपल्या निर्ढावलेपणावर आसूड ओढण्यासाठी? असा काही त्याचा उद्देश असेल तर त्यात तो अतोनात यशस्वी झाला आहे असं मी खात्रीने सांगेन. आणि ते मी सांगण्याची गरजसुद्धा नाहीय. वाचक म्हणून संतोषचं बोट धरून आपण या माणसांच्या दुनियेमध्ये शिरलो की असाच अनुभव आपणा सगळ्यांना येईल. ज्या जखमा तो आपल्यापर्यंत पोहोचवतो, त्या मुळात त्याला झालेल्या आहेत. या लेखनातून त्या तो आपल्याशी वाटू बघतोय, आपल्याशी शेअर करू चाहतोय. 'सुक वाटल्यानी वाढातं, दुक वाटल्यानी कमी व्हतं' असं म्हणतात- म्हणजे माझ्या लहानपणी खेड्यात आमच्या आया-बाया म्हणत. त्यांच्या कहाण्यांमध्ये असे वाक्प्रचार सहज येत. किंवा, 'सांगू नायी पन सांगायची वग येती' असंही. म्हणजे, 'सांगण्यासारखं नाहीय खरं तर, पण ओघाने आलंय म्हणून सांगतेय' असं प्रमाणभाषेत. वग म्हणजे ओघ. त्या कहाण्यांच्या दुनियेत कारुण्य आणि वेल्हाळपण कायम असे. संतोष त्याच प्रकारच्या कहाण्या इथे मांडतोय. निर्मितीच्या प्रेरणांच्या अनेक अंगांपैकी एक अंग स्वतःचं दुःख कमी करणं हेसुद्धा असतं. अर्थात तसं ते होतंच असं नाही. पण लिहिणारा कळत-नकळत तसा प्रयत्न करत असतो. ही सगळी माणसं अगदी नजीकच्या भूतकाळात नाहीशी झालेली आहेत. बव्हंशी ती सगळी संतोषने त्याच्या लहान वयात पाहिलेली आहेत. त्यातली काही मधली काही वर्षं नाहीशी होऊन अलीकडच्या काळात दीनावस्थेत त्याला सामोरी आलेली आहेत. त्यांच्या त्या अवस्थेने त्याला अस्वस्थ केलेलं आहे. आपल्या देशाला अगदी अगतिक होऊन आय.एम.एफ. आणि वर्ल्ड बँकेच्या अटी स्वीकारत आपली अर्थव्यवस्था जगातल्या धनदांडग्या देशांसमोर खुली करावी लागली, त्यांच्या नफेखोरीसाठी आपली व्यवस्था खुली करावी लागली त्याला साधारणतः २५ वर्षं झालेली आहेत. गांजलेली सामान्य माणसं त्याच्या आधीपासून त्यांच्या आयुष्यातून हटत होती; पण त्यांच्या हटण्याने तोवर निदान काही प्रमाणात तरी आपलं काळीज हलत होतं. गेल्या २५ वर्षांत आपल्या काळजांचं असं हलणं जवळपास थांबलं आहे. आपण अगदी निर्ढावून गेलो आहोत. संतोषने ज्यांची चरित्रं या लेखनात उभी केलेली आहेत ती माणसं आता




बहादूर थापा आणि इतर कविता
संतोष पद्माकर पवार
साधना प्रकाशन
पृष्ठे : १५२
मूल्य : १२५/-

**समकालीन महत्त्वाचे कवी संतोष पद्माकर पवार यांचा 'बहादूर थापा आणि इतर कविता' हा कवितासंग्रह अलीकडेच साधना प्रकाशनाच्या वतीने प्रकाशित झाला आहे. या संग्रहावर भाष्य करणारा ज्येष्ठ लेखक रंगनाथ पठारे यांचा लेख.**



अनुक्रमणिका


राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

अधिक वेगाने जगण्यातून परागंदा होऊ लागली आहेत. मुख्य म्हणजे ती आपल्या मनातून जवळपास हद्दपारच झालेली आहेत. जागतिकीकरणाच्या रौप्यमहोत्सवाच्या या काळात त्यांचं आपल्या मनातून असं हटणं एक कलावंत म्हणून संतोषला क्लेशकारक वाटलं असेल हे सरळच. तो योगायोग नाहीय. वेगाने बदलत्या काळातील मूल्यांच्या पडझडीला एका सर्जनशील कलावंताने, एका कवीने दिलेली ती प्रतिक्रिया आहे. त्याने इथे या माणसांच्या आठवणींचा जागर मांडला आहे. त्यांच्या कहाण्या सांगितल्या आहेत.

**काय आहेत या कहाण्या ?**

रभाजी गणपत कडलग. कुणबी. सरळ, ताठ, दणकट, प्रांजळ वारकरी. रामकाठीसारखा चारचौघांत उठून दिसणारा. अस्मानी झेलून सुलतानी थोपवणारा. त्याची मुलं त्याच्या विरोधात जाऊन त्याचा अपमान करू लागली, चलाख आणि दांडग्या नेत्यांसमोर दंडवत घालू लागली तेव्हा तो त्याच्या वयाच्या पंचाहत्तरीत रानात आणखी जोराने काडी-कचरा वेचू लागला, वखर-पाळ्या काढू लागला. एका उन्हं चढीच्या हंगामात त्याचं सारं घर शहराकडे त्याच्या नातवाच्या लग्नाच्या बस्त्याला गेलेलं असताना तो एकटाच बरडाच्या रानात हरभरे पेरत होता. कोणी तरी त्याला त्या बस्त्याची खबर दिली तरी त्याची पाभर थांबली नव्हती. सांजच्याला बस्त्यावरून परत आलेल्यांना लक्षात आलं की रभाजी अजूनही घरात नाहीय. शोधताना ते रानात गेले, तर तिथे हा हातात हरभरे गच्च धरून पाभरीमागे प्राण सोडलेला, अन् त्याची हाक येईना म्हणून गोंधळून खोळंबलेले उभे बैल.

गुजाबाई धनगरीण. शेतकरी. दहा गड्यांचं काम एकटीने ओढण्याची ताकद आणि हिंमत राखून असलेली. तिच्या बारक्या रानातली महाराणी. दिलदार आणि दणकट. शहर वाढत होतं आणि तिच्या शेतावर गुंठेवारीचा दवाब सुरू होतो. पण मुलं, नातू क्रमशः बेवडेबाज, बाईबाज निघतात. ते सेटलमेंट करून जमीन विकत राहतात. डोळे गेलेल्या जख्ख म्हाताऱ्या गुजाबाईला शिर्डीला साईबाबाच्या मंदिरासमोर भीक मागत जगण्याची पाळी येते. हिराबाई जाफरमियाँ जहागिरदार. जाफरमियाँ लजपतवाडीचा नावालाच उरलेला जहागिरदार. पाच पोरांचा बाप. त्याचा त्याच्या जोरूच्या भावांशी किरकोळ तंटा होतो. अंगणात बायको-पोरांसोबत झोपलेल्या त्याच्या बायकोची तिला तो समजून तिचे भाऊ तलवारीने खांडोळी करतात. जाफरमियाँ त्याच्या हिंदू मित्रांसोबत तीर्थयात्रा करत हिंडत असताना तुळजापुरात त्याला हिराबाई भेटते. तो तिला वरी घेऊन येतो. खजुराच्या झाडाला नारळ लटकावेत तशी ती त्याची बीवी आणि त्याच्या पाच पोरांची आई होते. दीक्षा घेऊन मुसलमानीण होते. मोठी होऊन मुलं पांगतात. जाफरमियाँ म्हातारा होऊन मरतो. एकाकी म्हातारी हिराबाई पुन्हा

# जगण्यातून परागंदा होणाऱ्या माणसांची कविता





अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

तुळजापूरला जाते आणि हिरवे चुडे, कुंकू असं विकत जगते. तिथे संतोषची भेट झाल्यावर तिचा प्रश्न : 'संतोसभाऊ, मला मेल्यावर लोक जाळतील का पुरतील रे? माझं नाव नोंदून बघ ना तुझ्या गावच्या कबरस्तानात नि सांग असासं झाल्तं म्हणून..' कमलाबाई भाऊराव भानुसे. गवंड्याच्या हाताखाली काम करणारा तिचा नवरा अकाली मरतो. उरते विधवा कमलाबाई आणि तिची शेजारच्या शहरात अकरावीत शिकत असलेली लेक. सायकलीवरून ये-जा करणारी. रस्त्यात दांडगे उंडगे त्या पोरीला अडवू लागतात. मग ती स्वतः लेकीसोबत सायकलवर जाऊ लागली. उंडग्यांनी गावात भूमका सोडली, दोघी रोज शहरात धंद्यासाठी जातात. कमलाबाई गरीब असली तरी घरंदाज. रीतसर अर्ज करते पोलिसात. गरिबाच्या अशा अर्जांची कोण दखल घेणार? आता दोघींचीही छेडछाड सुरू होते. कमलाबाई तालुक्याच्या आमदाराला भेटते. तिथे कार्यकर्ते म्हणतात, बाई, तुम्ही आम्हाला जॉइन व्हा. साह्यबांच्या व्हा. तुमची पोरगी फुलासारखी राहील साहेबांजवळ. कमलाबाई राज्याच्या गृहमंत्र्याला पत्र लिहिते. उत्तर नाही, विचारणा नाही. एक दिवस एक पोलिस येतो. कोऱ्या कागदावर सही घेऊन जातो. नंतर कमलाबाई सोबत असतानादेखील गुंड तिच्या लेकीला खेचतात. गर्दीमुळे सुटते पोर. त्या दोघी तक्रार करायला पोलिस चौकीत जातात. पोलिस कागद फडकावत सांगतात, 'बाई, तूच लिहून दिलेलं आहेस. तक्रार नाहीय. गुंड शरण आलेत.' त्या बाहेर पडतात. एक चारचाकी येते आणि पोरीला ओढून नेते. वर्षं लोटतात. 'पोरीचंच लफडं आसंल!' पोलिस हसत हसत बोलतात. अशी आणखी किती तरी माणसं आहेत. 'साहेब, देवाशेजारी देव ऱ्हाईल रातभर, त्यांच्यात भांडण नाही झालं... मला कामून तुम्ही धरलं?' असा सवाल करणारा बाळू पिराजी; 'आमचं पोट आमच्या घोट्यावर बांधलेलं असतं' असं सांगणारी, तमाशात नाचणारी छबू; एस.टी.बसमध्ये तिचे स्तन दाबू पाहणाऱ्या माणसाची तक्रार कंडक्टरकडे करताना 'हे माणूस पहा ना! पोराच्या प्यायचं दाबतंय' असं बोलणारी तम्मा, ताई वैदीन, धुरपदा आणि शारदा अत्याचार सहन करणं हेच बाईचं आयुष्य असतं असा समाज झालेली सोनी, लढाऊ कार्यकर्ता जॉन आणि त्याला नामोहरम करणारी यंत्रणा, नागू आणि त्याच्या डोळ्यांसमोर कुत्र्यांनी फाडून खाल्लेलं त्याचं बाळ. बहादूर थापा. नेपाळहून आलेला. रात्रीचा पहारेकरी. एकाकी. स्वप्नं पाहणारा. त्याच्या मुलखातल्या कांचीशी लग्न करण्याचं स्वप्न पाहणारा. कांची भेटायला येणार म्हणून तिच्या प्रवासासाठी पैसे मध्यस्थास देणारा. तो मध्यस्थ तिला इकडे आणून वेश्यागृहात विकतो हे कळल्यावर त्या मध्यस्थास कुकरीने रक्तस्नान घालणारा.

> **जागतिकीकरणाच्या स्वार्थी आणि निर्मम सार्वत्रिक लोंढ्यात ही माणसं त्यांच्या नेक जगण्याच्या आकांक्षांसकट वाहून जातात. त्यांच्या अशा वाहून जाण्याची वेदना या साऱ्या कहाण्यांमध्ये महत्तम साधारण विभाजकासारखी सतत आहे. या कवितांना या वेदनेची दुखरी लय कायम लगडलेली आहे. या कविता आहेत? की कहाण्या? दोन्हीही. एक तर कवीने त्या कविता म्हणून लिहिलेल्या आहेत. कवितेतून कहाण्या सांगणं हा संतोषच्या कवितेचा एक अटळ स्वभाव आहे.**

कुणबी, धनगर, मुसलमान, गरीब घरंदाज मराठा विधवा, दलित, नाचणारीण, हिजडा, वडारीण, वैदीण, बँड वाजवणारा, न्हावी, गुरखा, गारुडी, कलाल असे हे लोक आहेत. हे कोणीही बडे नाहीत, बडे होण्याची स्वप्ने पाहणारे नाहीत. वाट्याला आलेल्या आयुष्याला थेट स्वीकारत जास्तीत जास्त नेकपणे आणि प्रामाणिकपणे जगण्याची कांक्षा बाळगणारे. तरीही अंततः हार, हलाखी त्यांच्या वाट्याला हमखास येते. नेकी आणि प्रामाणिकपण यांची हार सगळीकडे कायम. उद्ध्वस्तता ही अंतिम परिणती. जागतिकीकरणाच्या स्वार्थी आणि निर्मम सार्वत्रिक लोंढ्यात ही माणसं त्यांच्या नेक जगण्याच्या आकांक्षांसकट वाहून जातात. त्यांच्या अशा वाहून जाण्याची वेदना या साऱ्या कहाण्यांमध्ये महत्तम साधारण विभाजकासारखी सतत आहे. या कवितांना या वेदनेची दुखरी लय कायम लगडलेली आहे. या कविता आहेत? की कहाण्या? दोन्हीही. एक तर कवीने त्या कविता म्हणून लिहिलेल्या आहेत. कवितेतून कहाण्या सांगणं हा संतोषच्या कवितेचा एक अटळ स्वभाव आहे. 'भ्रमिष्टाचा जाहीरनामा' या दीर्घकवितेत त्याने माणसाला भ्रमिष्ट करणाऱ्या गरगरत्या सामाजिक, सांस्कृतिक वास्तवाचा वेध घेताना त्याच्या निर्मम विक्राळ वर्तमानाची पेटती कहाणीच सांगितलेली आहे. 'पिढीपेस्तर प्यादेमात' या त्याच्या कवितासंग्रहात हा त्याचा स्वभावविशेष थेट प्रकट झालेला



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

आहेच. या संग्रहात अशा कहाण्या सांगताना त्याचा हा स्वभाव मुक्त प्रकट झालेला आहे. त्याचं कवी असणं त्याच्या प्रकट होण्याच्या रीतीशी अभिन्न राहिलेलं आहे. उदाहरणार्थ,

*'शारदीच्या तकलीफीत वाढ होत गेली*
*पण ती साऱ्यातून फुलून येत गेली*
*गायरानातली कोरांटी बहरत जावी*
*किंवा सावरीच्या काट्यांतून लालेलाल*
*बोंडांनी झडती धरावी तशी*
*कारण लाकूड होऊन वाळून गेलेल्या*

मायच्या वेलावर उगवून आलेला हिरवा कोंब होती शारदी' हे अत्यंत प्रतिकूल वातावरणात फुलणाऱ्या शारदेचं वर्णन. किंवा,

*'तू काळीत पेरलेला होतास कायमचा*
*पंचक्रोशीत कुठूनही दिसू शकणाऱ्या*
*रामकाठीसारखा*
*नेटानं वाढवीत नेलास बारदाणा*
*आता पसारा आवरता आवरेना झाला*

झाडाझुडपांशी बोलायचा त्यांच्याच कळू जाईल भाषेत.....' हे रभाजी गणपत कडलगचं चित्रण. हे कवितेतच येऊ शकतं. आणि हे असं संग्रहभर भरभरून आहे.

ही माणसं परागंदा झाली. त्यांच्या सोबत चिवट जीवनाकांक्षा आणि प्रामाणिकता हतबल झाली, हे कवीचं सगळ्यात मोठं शल्य आहे. ही दोन्ही मूल्यं संतोषच्या ठायी किती जोरकस आहेत, हे आज त्याचा मित्र म्हणून आणि त्याला बराच आधीपासून ओळखत असल्यामुळे मला माहीत आहे. त्यासाठीचं बळ त्याने या अशा माणसांमधून मिळवलेलं असेल. अन् ती सगळी या त्या प्रकारे पराभूत झालेली, जगण्यातून हटलेली पाहणं हे ह्या मूल्यांचं हटणं आहे. जगण्याचे आधार नाहीसे होणं आहे. संतोष हट्टी आहे. या मूल्यांना हटू द्यायची त्याची तयारी नाहीय. आपल्यामधूनसुद्धा ती संपू नयेत असं त्याला खूप आतून वाटतं. त्यासाठी तो ही कविता घेऊन आपल्यासमोर आलेला आहे. प्रश्न संतोषचा नाहीय. निवड आपल्याला करायची आहे. ती निकड आपल्याला किती वाटते हा आपला प्रश्न आहे. ही कविता लिहून संतोषने तो निकरावर आणलेला आहे. या कविता वाचून मी अस्वस्थ झालो. मला खूप त्रास झाला. तो आपल्यालाही होवो. तो नक्कीच होईल याची शुभेच्छापूर्वक ग्वाही देतो.

●

**रंगनाथ पठारे**
चलभाष : ९८५०१२१५१५
rangnathpathare@gmail.com

'महाराष्ट्र साहित्य परिषदे'चा महत्त्वाकांक्षी प्रकल्प

**भारतीय भाषांतील स्त्रीवादी साहित्य**

संपादक : **डॉ. अश्विनी धोंगडे**



**ग्रंथाची वैशिष्ट्ये**

- मराठीसहित हिंदी, इंग्रजी, तेलुगू, कन्नड, गुजराती, तमिळ, मल्याळम, उडिया, बंगाली, पंजाबी, उर्दू, आसामी या भारतीय भाषांतील स्त्रीवादी साहित्याचा मागोवा घेणारा एक महत्त्वपूर्ण ग्रंथ.
- त्या त्या भाषांतील अभ्यासक-संशोधकांचे सखोल अभ्यासपूर्ण लेख.
- दर्जेदार मांडणी, छपाई व उत्तम बांधणी.
- महत्त्वाच्या लेखकांच्या छायाचित्रांचा विशेष विभाग.
- अभ्यासकांसाठी एक महत्त्वाचा संदर्भमूल्य असलेला ग्रंथ!

किंमत ८०० रुपये

**संपर्क :**
प्रमुख कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता, पुणे ४११०३०. दूरध्वनी : ०२०-२४४७५९६३



विशेष लेख

डॉ. द. ता. भोसले



# साने गुरुजींचे योगदान

११ जून २०१६ हा दिवस साने गुरुजींचा स्मृतिदिवस. साने गुरुजींनी मराठी साहित्याला दिलेले योगदान महत्त्वाचे आहे. त्यांचे सामाजिक योगदानही मोलाचे आहे.
या निमित्ताने साने गुरुजींच्या योगदानावर प्रकाश टाकणारा ज्येष्ठ लेखक डॉ. द. ता. भोसले यांचा लेख.

स्वातंत्र्यपूर्व काळात राजकीय आणि सामाजिक क्षेत्रात व्रतस्थ वृत्तीने काम करणारी जी उत्तुंग व्यक्तिमत्त्वे होती त्यामध्ये साने गुरुजींचा प्राधान्याने समावेश करायला हवा. देशाचे स्वातंत्र्य, सामाजिक समता, शिक्षणाचे महत्त्व, उदात्त पत्रकारिता आणि 'माणूसपण' हिरावून घेणाऱ्या घृणास्पद रूढी-परंपरा यांच्याविरुद्ध लढणाऱ्या थोर विभूतींमध्ये त्यांचा समावेश करायला हवा. किंबहुना, मला असे वाटते, की साने गुरुजी हे थोर आणि अपवादात्मक असे व्यक्तिमत्त्व होते. त्यांच्या चरित्रातील काही बाबींचा आधार घेऊन बोलायचे झाले, तर गिरणीच्या खाली सांडलेल्या पिठाची भाकरी खाऊन भडकलेल्या भुकेचा पराभव करणारा हा एकमेव विद्यार्थी असावा. चिमणीचे कोवळे पिलू मेल्यावर तीन दिवस उपवास करून व्याकूळ होणारा हा एकमेव कुमार असावा. वसतिगृहातल्या विद्यार्थ्यांच्या खोल्या झाडणारा आणि त्यांचे कपडे धुणारा हा एकमेव शिक्षक असावा. आपल्या शाळेतील गोपाळ नावाचा शिपाई टायफॉइडने आजारी असताना रुग्णसेवा म्हणून त्याची सारी कामे करणारा हा एकमेव सहकारी असावा. फर्ग्युसन कॉलेजमध्ये शिकणाऱ्या मुलांचे स्वयंपाकपाणी करून खाऊ घालणारा आणि घरातली धुणीभांडी करून त्यांना अभ्यासाला वेळ देता देता संस्कारशील बनविणारा हा एकमेव शिक्षक असावा. खाणावळीचे पैसे भरता न येणाऱ्या गरीब मुलांना जेवण देण्यासाठी स्वतः एक वेळ जेवणारा हा एकमेव शिक्षक असावा. एकाच बैठकीत शंभर पानांचा ग्रंथ लिहिणारे मराठीतील ते एकमेव लेखक असावेत. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर गरिबांचे दुःख कमी न झाल्याने आपण दिलेले वचन खोटे ठरले म्हणून स्वेच्छेने मरणाला आलिंगन देणारा हा एकमेव देशभक्त असावा. विद्यार्थ्यांचा शिक्षक, पालकांचा मार्गदर्शक, मूल्यांचा उपासक आणि समाजाचा सेवक या चारी भूमिका एकाच वेळी जगणारा हा एकमेव नेता असावा. एवढेच नव्हे, तर मुलांमध्ये रमणारा, मुलांना गोष्टी सांगताना रंगून जाणारा, मुलांसाठी रसवेल्हाळ लेखन करणारा, मुलांबरोबर मूल होऊन खेळणारा, मुलांचे भावविश्व संस्कारांनी सुगंधित करणारा आणि आईचे हृदय असलेला साने गुरुजी नावाचा हा एकमेव 'गुरुजी' असावा. या साऱ्या गोष्टी एका व्यक्तीच्या ठायी मिळणे दुरापास्त. म्हणूनच प्रारंभी ते 'अपवादात्मक' असे व्यक्तिमत्त्व होते, असे मी म्हटलेले आहे.



अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

महाराष्ट्र साहित्य परिषद




साने गुरुजींनी सुरू केलेली 'साधना' आणि 'कथामाला' ही नियतकालिके म्हणजे त्यांची 'वाङ्मयीन अपत्येच' म्हणावी लागतील. ही दोन्ही नियतकालिके म्हणजे समाजावर संस्कार करणारे प्रकाशदीपच म्हणावे लागतील. साने गुरुजींच्या ध्येय-धोरणाचा आदर्श समोर ठेवून आजही ही दोन्ही नियतकालिके आपल्या जीवनप्रवासात पायापुढे प्रकाश पेरण्याचे कार्य निष्ठेने करीत आहेत, आणि कालच्यापेक्षाही त्यांची आवश्यकता आजच्या पडझडीच्या काळात अधिक आहे. आज जे समाजाचे नैतिकदृष्ट्या झपाट्याने अधःपतन होत आहे, त्याचे कारण लोप पावत चाललेले संस्कार आणि संस्कार नसलेले शिक्षण यामध्ये आहे. आज कोणत्याही दैनिकाचे पान उघडले की अनाचार, दुराचार, भ्रष्टाचार, स्वैराचार, बलात्कार, खून, फसवणूक, चोरी आणि दहशत-दंडुकेशाही यांच्याच बातम्या अधिक प्रमाणात वाचावयास मिळतात. चंगळवादाची शिकार होत चाललेल्या आजच्या समाजाला इंद्रियसुखाची तृप्ती आणि भोगासक्त जीवनाची अनावर ओढ यापलीकडे जीवन नाही असेच वाटते. त्यामुळे नकळत तो भोगासक्त जीवनाचा गुलाम होऊ लागला आहे. किंबहुना, 'गुलामी' या एकाच शब्दात आजच्या समाजाचे वर्णन करावे लागेल. आजचा आपला बहुसंख्य समाज संपत्तीचा 'गुलाम' झाला आहे, भुकेचा 'गुलाम' झाला आहे, वेळेचा 'गुलाम' बनलेला आहे, शरीराचा 'गुलाम' झाला आहे, स्वार्थाचा 'गुलाम' बनला आहे आणि व्यसनाचाही 'गुलाम' बनत चालला आहे. भूक, भोग आणि भय यांच्या कात्रीत सापडलेला आजचा आपला समाज एका बाजूने यंत्रवत होत चालला आहे आणि दुसऱ्या बाजूने पशुत्वाच्या पातळीवर घसरतो आहे. त्यामुळे तो मानसिक आनंदाला पारखा होत चालला आहे. शरीरावर सुखाची सूज वाढते आहे आणि आत्मा दिवसेंदिवस सुकत चालला आहे. त्यामुळेच तो अस्वस्थ होतो आहे. अशांतीमुळे तो सैरभैर झाला आहे. म्हणून शरीर आणि आत्मा किंवा मन यांच्या शाश्वत सुखासाठी संस्कार गरजेचे आहेत. कालच्यापेक्षा आज त्यांची खूप आवश्यकता भासते आहे.

चिंता वाटावी अशी गोष्ट म्हणजे संस्कार करण्याची ऊर्जाकेंद्रे आज त्यामानाने खूप क्षीण झालेली आहेत आणि कमीही झालेली आहेत. पूर्वी आई-वडिलांना संस्कार करता येत होते. आता पोटाच्या पाठीमागे लागलेल्या पालकांना स्वतःलाच वेळ मिळत नाही तर मुलांसाठी कुठून मिळणार? ग्रामीण परिसरातील पालकांना शेतीभाती, गुरेढोरे, राजकारण, निवडणुका यामुळे असे संस्कार करायला वेळ कुठे असतो? घरातली माउली अठरा तास कामात बुडालेली असते. तिला श्वास घ्यायला वेळ नसतो तर संस्कार करायला कुठून असणार? शाळेतील शिक्षक आपल्या विद्यार्थ्यांवर उत्तम संस्कार करायचे. अध्यापनाइतकेच ते आचारातून, विचारातून, सेवेतून संस्कार करायचे. एकेका मुलाला उत्तम कर्तबगार नागरिक बनवायचे. आता या कर्तव्यात ते कमी पडत आहेत. आणि काही तर मुखामध्ये तंबाखूचा लाडू ठेवूनच संस्कारावरील तासाला जात असतात असे दृश्य पाहावायास मिळते. समाजावर आणि विशेषतः बालकांवर-कुमारांवर संस्कार करण्यात कायदा उपयोगी पडत नाही. दारूबंदीचा कायदा केला, हुंडाबंदीचा कायदा केला, अघोरी आणि शोषण करणाऱ्या परंपरा आणि अंधश्रद्धा याविरोधात कायदा झाला; पण वास्तवात या कुप्रथा नांदताना आपण पाहतोच. स्वार्थ आणि परंपरेला शरण जाणारे मन ही यामागची कारणे आहेत. शिवाय कायद्याने सक्ती केली जाते. आणि जेव्हा सक्ती होते तेव्हा सामान्य माणसाच्या मनात अधिक आसक्ती निर्माण होते. जेव्हा माणसाच्या मनात अनावर आसक्ती निर्माण होते तेव्हा त्याची विकृती तयार होते. जेव्हा विकृती निर्माण होते तेव्हा माणसाची अधोगतीकडे वाटचाल सुरू होते, व अधोगती माणसाच्या जगण्याची शक्तीच हिरावून घेत असते. म्हणून कायद्याला या बाबतीत निरुपयोगी म्हटले आहे. तीच गोष्ट धर्म आणि धर्मगुरू, आचार्य यांच्याबाबत म्हणता येईल. पूर्वी मंदिरातून आणि धर्मपीठातून समाजावर संस्कार केले जायचे. आता धर्मालाच 'धंद्याचे' रूप आलेले आहे आणि संन्यस्त आचार्यच आता प्रापंचिकापेक्षा भोगलोलूप झालेले आहेत. जीव-जगत, आत्मा-परमात्मा, पाप-पुण्य, स्वर्ग-नरक, संसार आणि मोक्ष यांची सुमार पोपटपंची करणाऱ्या आसक्त आणि ढोंगी महाराजांची संख्या खूप वाढलेली आहे. त्यामुळे मंदिरातून आता संस्कार होत नाहीत, तर बाकीचे संस्कार सोडून सारे व्यवहार होत आहेत. पूर्वी देशासाठी आपले अवघे आयुष्य समर्पित करणाऱ्या देशभक्तांच्या जीवनातून समाजावर संस्कार व्हायचे. तत्त्वनिष्ठ, ध्येयनिष्ठ, देशनिष्ठ आणि चारित्र्यसंपन्न अशा शेकडो देशभक्तांनी आपले उमलते आयुष्य मातृभक्तीच्या चरणी अर्पण केले. त्यामुळे त्यांच्या शब्दाला वजन प्राप्त झालेले होते. म. गांधी, डॉ. राजेंद्र प्रसाद, लालबहादूर शास्त्री, विनोबाजी भावे यांच्या एकेका विधानातून सारा समाज ढवळून निघाला होता. या साऱ्यांचा मथितार्थ एवढाच, की हे सारे घटक संस्कार करण्याच्या संदर्भात फारसे उपयोगी पडणारे नाहीत. म्हणून असे



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

म्हणावेसे वाटते, की आजच्या समाजाला कसदार आणि जीवनवेधी साहित्यच यासाठी उपयोगी पडणार आहे. साने गुरुजींची कथामाला ही बालमनावर आणि कुमारांवर संस्कार करणारी 'अमृतसरिता' म्हणावी लागेल. साने गुरुजींचे सर्वच साहित्य जीवनाला संस्काराची ऊर्जा देणारे शक्तिकेंद्र आहे.

पशुपातळीवर वावरणाऱ्या मानवी जीवनाला उन्नत करण्यासाठी संस्कारांशिवाय दुसरा मार्गच नाही. कारण संस्कारांमुळेच माणसाची विकृती कमी होते, त्याचे जीवन उदात्त आणि निकोप बनते. चिरंतन स्वरूपाचेच खोलवर झालेले संस्कारच जीवनाला समृद्ध व श्रीमंत करीत असतात, जीवनाचा अर्थ आणि अन्वयार्थ सांगत असतात, जीवनातील श्रेयस-प्रेयस यातला फरक स्पष्ट करीत असतात. विकृतीचे संस्कृतीत, आसक्तीचे विरक्तीत, वासनेचे विवेकात, स्वार्थाचे परोपकारात आणि भोगाचे त्यागात रूपांतर करण्याचे फार मोठे सामर्थ्य या संस्कारांत असते. त्यामुळेच आपले जगणे कृतार्थ व्हायचे असेल तर संस्कारसंपन्न आचरणाशिवाय पर्याय नाही, असे म्हटले तर अतिशयोक्तीचे होणार नाही. कथामालेचे स्वरूप आणि कार्य संस्कारसंपन्न माणूस घडविणे हे असल्याने आजही कथामालेचा अंक वाचक आणि बालक या दोघांनी वाचावयास हवा.

थोडक्यात असे म्हणता येईल, की साहित्यातून होणारे संस्कार हे माणसाला 'पशुत्वा'कडून 'मनुष्यत्वा'कडे नेतात, मनुष्यत्वाकडून 'संतत्वा'कडे नेतात, संतत्वाकडून 'देवत्वा'कडे नेतात आणि 'आत्मप्रेमा'कडून मानवप्रेमाकडे नेत असतात आणि संकुचिततेकडून विशालतेकडे घेऊन जातात. संस्कार माणसाला माणसाशी जोडण्याचे काम करतात. जातिपातीच्या आणि श्रेष्ठ-कनिष्ठतेच्या भिंती जमीनदोस्त करतात, जीवनाकडे पाहण्याचा दृष्टिकोन निकोप करतात आणि आपल्या जगण्यावर प्रेमही करायला शिकवितात. जो आपल्या ताटातला घास दुसऱ्या भुकेल्या माणसाच्या मुखात घालतो, जो मातेच्या कळवळ्याने दुःखितांचे अश्रू पुसतो, रस्त्यावर पडलेल्या महारोग्याला गळ्याशी धरतो, जो वेदनेने घायाळ झालेल्या अनाथाला प्रेमाने आधार देतो, जो कृती आणि उक्ती-आचार आणि विचार यात भेद न करता जगतो-वागतो, त्यालाच जीवनाचा अर्थ कळतो, त्यालाच संस्कारांतून सांडणारे तेज प्राप्त होते. साने गुरुजी या अशा विभूतींमध्ये सामावणारे आहेत. कारण त्यांनी साहित्यातून संस्कारांचे चांदणे शिंपले, साहित्यातून संस्कारांचे अमृतपान घडविले. असे हे संस्कार बालवयात आणि कुमारवयात होणे आवश्यक असते. वाळलेल्या चिखलाला जसा आकार देता येत नाही, तसे प्रौढ मनाला हे संस्कार उपयोगी होत नाहीत. पाषाणावर ओतलेल्या पाण्यासारखे ते वाहून जातात, निरर्थक ठरतात.




साने गुरुजींचे व्यक्तिगत आयुष्य आणि त्यांच्या साहित्याची थोरवी हा एक स्वतंत्र लेखाचा विषय असल्याने त्यावर चार शब्द लिहिण्याऐवजी त्यांनी या महाराष्ट्राला आणि इथल्या समाजाला कोणते योगदान दिले याचाच सूत्ररूपाने येथे परामर्श घ्यायचा आहे. साने गुरुजींचे माझ्या दृष्टीने सर्वांत महत्त्वाचे योगदान म्हणजे त्यांनी आपल्या धर्माची व्याख्याच पार बदलून टाकली हे आहे. 'खरा तो एकचि धर्म। जगाला प्रेम अर्पावे' हे त्यांच्या अवघ्या जीवनाचे सार होते. त्यातूनच त्यांनी इंद्रियसुखाला खाद्य पुरविणाऱ्या निरर्थक कर्मकांडातून धर्माची मुक्तता केली, अर्थशून्य असलेल्या मंत्रोच्चाराच्या पाठांतरातून धर्माला मुक्त केले. धर्मोपासना म्हणजे साग्रसंगीत पूजाअर्चा नव्हे. धर्म म्हणजे तीर्थक्षेत्री केलेले स्नान नव्हे. धर्म म्हणजे विशिष्ट पदार्थ खाऊन केलेला उपवास नव्हे. पारंपरिक वस्त्र-प्रावरणे परिधान करून जीवात्मा-परमात्मा, स्वर्ग-नरक यावर केलेले साचेबंद प्रवचन म्हणजे धर्म नव्हे; तर निरपेक्ष प्रेम म्हणजे धर्म, उपेक्षितांची केलेली सेवा म्हणजे धर्म, अनासक्त व अपरिग्रह जीवनाचे आचरण म्हणजे धर्म; दान, समता ,ममता, करुणा, मानवता म्हणजे धर्म, असे त्यांनी आग्रहाने प्रतिपादिले. अशा या धर्मातूनच नैराश्याचा अंत होतो, कर्तृत्वाला पालवी फुटते, अंधाराचे प्रकाशात रूपांतर होते, अनाथांना आधार मिळतो अशी त्यांची धारणा होती. माणसाने माणसाशी माणुसकी व प्रेमाने वागणे म्हणजे खरा धर्म, ही त्यांनी धर्माची केलेली सर्वस्पर्शी व्याख्या होती. आणि त्यासाठीच एके काळी अस्पृश्य मानल्या गेलेल्या माणसासाठी पंढरपुरी त्यांना उपोषण करावे लागले होते. धर्माच्या बदललेल्या व्याख्येमुळे मंदिरप्रवेशाची क्रांती झाली हे आपणाला विसरता येणार नाही.

साने गुरुजींनी केवळ धर्माची व्याख्या बदलली नाही, तर त्यांनी क्रांतीचीही व्याख्या बदलून टाकली होती. त्यांच्या मते एखाद्या वेडासाठी-एखाद्या स्वप्नपूर्तीसाठी चार निरपराध्यांना गोळ्या घालणे म्हणजे क्रांती नव्हे. चार दुकाने पेटविणे, चार बसेस जाळणे, चार इमारतींना आग लावणे, चार-सहा घरांवर दगडफेक करणे आणि कायदा हातात घेऊन सामान्यांच्या रोजी-रोटीला पायबंद घालणे म्हणजेही क्रांती नव्हे. खरे तर ही क्रांतिकल्पनेची विटंबना आहे. साने गुरुजींना ही क्रांती अभिप्रेत नव्हती. त्यांच्या मते विध्वंस



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

म्हणजे क्रांती नव्हे. वरवरचा तात्कालिक बदल म्हणजे क्रांती नव्हे. जाचक बंधनांचा नायनाट म्हणजे क्रांती. न्यायाची प्रतिस्थापना म्हणजे क्रांती. श्रमांची पूजा करणारा आणि विवेकाच्या वाटेवरून चालणारा समाज निर्माण करणे म्हणजे क्रांती होय. ज्या समाजात कुळाची प्रतिष्ठा, बळाची प्रतिष्ठा, वर्णाची श्रेष्ठता आणि धनाची प्रतिष्ठा पुसून टाकलेली असते तो समाज क्रांतिप्रेमी मानला पाहिजे, असे त्यांना वाटत होते. सत्यम्, शिवम् आणि सुंदरम् यांची निष्ठापूर्वक केलेली उपासना म्हणजे शाश्वत स्वरूपाची क्रांती होय. आणि ही क्रांती जनातही व्हावी लागते, मनातही व्हावी लागते यावर गुरुजींचा विश्वास होता. अशी क्रांती होण्यासाठी त्यांनी शिक्षण, प्रबोधन, आचरण आणि समर्पण या चार गोष्टींचा आधार घेतलेला होता. म्हणूनच साने गुरुजींनी शेकडो शिष्य या धारणेतून निर्माण केले आणि स्वातंत्र्य चळवळीला उदंड बळ दिले. साने गुरुजींचे मानसपुत्र असे ज्यांना संबोधिले जाते ते सारे या क्रांतिपर्वाचे साधक होते आणि उपासकही होते.

केवळ मतदानाचा हक्क मिळणे म्हणजे स्वातंत्र्य नव्हे. प्रशासनामध्ये गोरा साहेब जाऊन निमगोरा साहेब येणे म्हणजेही स्वातंत्र्य नव्हे. जात, धर्म, लिंग, भाषा आणि प्रदेश त्यांच्या उभ्या असलेल्या भिंती पाडून 'भारतीय' होणे म्हणजे स्वातंत्र्य. दुसऱ्याच्या मताचा आदर करणे म्हणजे खरे स्वातंत्र्य. मानवाने मानवाला मानवतेने वागविणे म्हणजे स्वातंत्र्य. गतार्थ रूढी-परंपरेविरुद्ध केलेले आचरण म्हणजे खरे स्वातंत्र्य, अशी त्यांची धारणा होती आणि ती त्यांनी लेखनातून, आपल्या भाषणांतून आणि आपल्या आचरणातून निष्ठापूर्वक दाखवून दिली होती.

साने गुरुजींनी हलक्या समजल्या जाणाऱ्या शरीरश्रमाला प्रतिष्ठा मिळवून दिली हेदेखील त्यांचे फार मोठे योगदान आहे. 'श्यामची आई' आणि इतर लेखनातून त्यांनी हे चित्रित केलेले आहेच, पण स्वतः रोजच्या व्यवहारात त्यांनी शरीरश्रमाची महत्ता दाखविली आहे. सेनापती बापट त्यांच्याकडे आले असताना दोघांनी गावातले रस्ते झाडण्याचे काम केलेली नोंद त्यांच्या चरित्रात आढळते. शाळेतल्या

**साने गुरुजींचे माझ्या दृष्टीने सर्वांत महत्त्वाचे योगदान म्हणजे त्यांनी आपल्या धर्माची व्याख्याच पार बदलून टाकली हे आहे. 'खरा तो एकचि धर्म। जगाला प्रेम अर्पावे' हे त्यांच्या अवघ्या जीवनाचे सार होते. त्यातूनच त्यांनी इंद्रियसुखाला खाद्य पुरविणाऱ्या निरर्थक कर्मकांडातून धर्माची मुक्तता केली, अर्थशून्य असलेल्या मंत्रोच्चाराच्या पाठांतरातून धर्माला मुक्त केले. धर्मोपासना म्हणजे साग्रसंगीत पूजाअर्चा नव्हे. धर्म म्हणजे तीर्थक्षेत्री केलेले स्नान नव्हे. धर्म म्हणजे विशिष्ट पदार्थ खाऊन केलेला उपवास नव्हे. पारंपरिक वस्त्र-प्रावरणे परिधान करून जीवात्मा-परमात्मा, स्वर्ग-नरक यावर केलेले साचेबंद प्रवचन म्हणजे धर्म नव्हे; तर निरपेक्ष प्रेम म्हणजे धर्म, उपेक्षितांची केलेली सेवा म्हणजे धर्म, अनासक्त व अपरिग्रह जीवनाचे आचरण म्हणजे धर्म; दान, समता ,ममता, करुणा, मानवता म्हणजे धर्म, असे त्यांनी आग्रहाने प्रतिपादिले.**



आपल्या समाजात अर्थ हरवून बसलेले आणि वापरून गुळगुळीत झालेले जे अनेक शब्द आहेत त्यामध्ये 'स्वातंत्र्य' या शब्दाचा समावेश करावयास हवा. या शब्दाचा वापर प्रत्येकजण आपापल्या स्वार्थासाठी वेगवेगळ्या रीतीने करीत असतो. रस्त्याच्या मध्यभागातून चालणारा माणूस त्याच्या भल्यासाठी सांगणाऱ्याला ताठरपणे म्हणतो, "रस्ता कुणाच्या बापाचा नाही. या रस्त्यावरून जाण्याचे मलाही स्वातंत्र्य आहे. मी कसाही जाईन. माझ्या स्वातंत्र्यावर गदा आणणारे तुम्ही कोण?" दुसरा कोणी म्हणतो, "मला अभिव्यक्तिस्वातंत्र्य आहे. मी कुणावरही टीका करू शकतो, शिव्यांचा वर्षाव करू शकतो. माझ्या बोलण्यावर बंदी घालणारे तुम्ही कोण?" यामुळेच 'स्वातंत्र्य' या शब्दाला फार वाईट दिवस आलेले आहेत. अशा या पार्श्वभूमीवर साने गुरुजींनी 'स्वातंत्र्या'चा अर्थही बदलून टाकला. त्यांच्या मते

शिपायाची कामे स्वतः करणे; स्वतःचे कपडे, भांडी, अंगण स्वतः स्वच्छ करणे; विद्यार्थ्यांना स्वतःच्या हातांनी भोजन तयार करून भरविणे; आजारी असलेल्या सेवकाची रुग्णसेवा करणे; काँग्रेस अधिवेशनात पत्रावळी उचलण्यापासून ते मैदान झाडण्यासाठी पुढाकार घेणे, अशी अप्रतिष्ठित मानली गेलेली कामे त्यांनी ईश्वराची पूजा समजून केलेली आहेत. त्या काळी आणि आजही शिकलेल्या माणसाने असली कामे करावयाची नसतात अशीच समाजाची धारणा आढळते. त्यांच्या दृष्टीने हातात खराटा घेणारा आणि हातात पूजेचे तबक घेणारा यांत कसलाही फरक नाही. किंबहुना पूजेचे तबक घेणाऱ्या पुरोहितापेक्षा झाडू घेणारा श्रेष्ठ, असे त्यांना वाटत असावे. श्रमाविना मिळालेला पैसा, श्रमाविना मिळालेले अन्न आणि श्रमाविना घेतलेले ज्ञान ही प्रतिष्ठा असलेली चोरी आहे असेच त्यांना



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद



**माणसाच्या डोळ्यातला अश्रू काही भेकड, भयग्रस्त आणि निराश मनाचे प्रतीक नव्हे. माणसाला झालेल्या दुःखाचे, वेदनेचे, प्रकटीकरण म्हणजे अश्रू नव्हेत. हतबल, निष्क्रिय व स्थितिशील माणसाचे मूक आक्रंदन म्हणजे अश्रू नव्हे. उलट, माणसाच्या जिवंतपणाची, निरोगी मनाची ती अर्थपूर्ण खूण आहे. साने गुरुजींच्या मते अश्रू म्हणजे जीवनाचे सार आणि सारांश आहे. मानवतेचे प्रतीक म्हणजे अश्रू, करुणा, दया आणि वात्सल्य यांना लाभलेले दृश्यरूप म्हजे अश्रू. अश्रू हा मानवी जीवनाचा अमोल ठेवा आहे. अश्रूंमध्ये फार मोठे सामर्थ्य सामावलेले आहे अशीच साने गुरुजींची धारणा होती.**

वाटत होते. ही श्रमसाधनेची तपस्या गुरुजींनी अगदी अखेरपर्यंत चालविली होती यात शंका नाही.

साने गुरुजींनी आपल्या संस्कृतीचा अर्थही अधिक व्यापक आणि अधिक विशुद्ध केला. सर्वसाधारणपणे चालत आलेल्या रूढी, परंपरा, विधी व गढूळ झालेल्या श्रद्धा यांचे जतन आणि अनुसरण म्हणजे संस्कृती मानले जाते. अर्थ हरवून बसलेल्या धार्मिक विधीचे आंधळेपणाने केलेले अनुकरण म्हणजे संस्कृतीची साधना असे मानले जाते. साने गुरुजींनी मात्र भूतकाळाचा सल आणि वर्तमानाचे सत्य यांचा सुंदर संगम साधून संस्कृतीच्या धारणेला विशाल रूप दिले. त्यांच्या मते परंपरेचे पालन म्हणजे संस्कृती नव्हे. पूर्वजांचा खोटा अभिमान म्हणजे संस्कृती नव्हे. धार्मिक विधीचे जतन म्हणजे संस्कृती नव्हे. यमनियमांत अडकलेले मानवी जीवन म्हणजे संस्कृती नव्हे. तर त्यांनीच एके ठिकाणी म्हटल्याप्रमाणे 'ध्येयासाठी सर्वस्वाचे समर्पण करणाऱ्या महान विभूतींचा इतिहास म्हणजे संस्कृती होय.' सत्ता आणि संपत्तीपेक्षा त्याग आणि पावित्र्याचा आदर करणे म्हणजे संस्कृती. सान्ताकडून अनंताकडे जाणारा, विकाराकडून विवेकाकडे जाणारा, विरोधातून विकासाकडे जाणारा आणि मानवजातीला मांगल्याकडे नेणारा विचार म्हणजे संस्कृती. त्यांनी पुढे म्हटले आहे, की 'भावना आणि बुद्धीला सुंदरता आणणारी प्रणाली म्हणजे संस्कृती.' इतकी व्यापक, सर्वस्पर्शी आणि येणाऱ्या काळामध्येही क्षीण न होणारी ही व्याख्या आहे. एका पाश्चात्त्य विचारवंताने म्हटले आहे, की 'जिच्यामुळे माणसाला जगावेसे वाटते नि जगणे वरदान ठरते तीस संस्कृती म्हणावे.' साने गुरुजींनी संस्कृतीविषयी केलेले भाष्य यापेक्षा फारसे वेगळे केले आहे असे म्हणता येत नाही.

जाता जाता त्यांच्या साहित्याविषयी असणारी अपुरी धारणा याचाही थोडक्यात विचार करणे आवश्यक वाटते. त्यांच्या साहित्याकडे पाहण्याच्या दोन भूमिका आढळतात. त्यांचे सहकारी आणि त्यांचे शिष्य असणाऱ्या मान्यवर विचारवंतांना साने गुरुजींचे साहित्य हे जीवनाला आकार देणारे, जीवनाला घडविणारे, जीवनाला उन्नत नि उदात्त करणारे, जीवनाची कृतार्थता सांगणारे व वाचकांच्या मनावर सखोल परिणाम करणारे असे श्रेष्ठ दर्जाचे वाटते. त्यांच्या मान्सपुत्रांनी असा अभिप्राय देणे एकवेळ आपण समजू शकतो; पण प्रा. नरहर कुरुंदकर, प्रा. भालचंद्र नेमाडे, प्रा. रा. ग. जाधव यांच्यासारख्या व्यासंगी व थोर समीक्षकांनी गुरुजींच्या साहित्याचे दाखवलेले मोठेपण आपण दुर्लक्षित करू शकत नाही. पण त्याबरोबरच सवंग मनोरंजनाला प्राधान्य देणाऱ्या लेखक-समीक्षकांना साने गुरुजींचे साहित्य हे रडके आणि फाजील भावविवश असे वाटते. वाचकांच्या डोळ्यांत अश्रू उभे करणे हे काही त्यांच्या मते श्रेष्ठ साहित्याचे लक्षण नव्हे. पण गुरुजींचे व्यक्तिमत्त्व जाणून घेतल्याशिवाय आणि त्यांच्या भूमिकेत गेल्याशिवाय अशी टीका करणे रास्त ठरणार नाही. माणसाच्या डोळ्यातला अश्रू काही भेकड, भयग्रस्त आणि निराश मनाचे प्रतीक नव्हे. माणसाला झालेल्या दुःखाचे, वेदनेचे, प्रकटीकरण म्हणजे अश्रू नव्हेत. हतबल, निष्क्रिय व स्थितिशील माणसाचे मूक आक्रंदन म्हणजे अश्रू नव्हे. उलट, माणसाच्या जिवंतपणाची, निरोगी मनाची ती अर्थपूर्ण खूण आहे. साने गुरुजींच्या मते अश्रू म्हणजे जीवनाचे सार आणि सारांश आहे. मानवतेचे प्रतीक म्हणजे अश्रू, करुणा, दया आणि वात्सल्य यांना लाभलेले दृश्यरूप म्हजे अश्रू. अश्रू हा मानवी जीवनाचा अमोल ठेवा आहे. अश्रूंमध्ये फार मोठे सामर्थ्य सामावलेले आहे अशीच साने गुरुजींची धारणा होती. म्हणून ते म्हणतात-

*अश्रू माझी आशा। अश्रू माझे बळ।*
*अश्रू हा निर्मळ। जवळ असो॥*
*अश्रू हा लहान। अश्रू हा महान।*
*अश्रू नारायण। आहे माझा॥*

सारांश, अनेक व्याप व व्यवधाने असतानाही ७५ पुस्तकांची निर्मिती करणारे ते एक थोर साहित्यिक होते. साहित्याला जीवनाच्या समीप आणणारे ते एक जीवनयोगी होते. लोकगीतांचे महत्त्व जाणणारे संस्कृतीचे उपासक होते. इतर भाषांतील साहित्य मराठीत आणणारे भाषादूत होते. आंतरभारतीचा नवा प्रयोग करणारे ते शिल्पकार होते आणि देशीवादाचा पुरस्कार करणारे शब्दप्रभू होते. आचार्य विनोबाजींच्या शब्दांत बोलायचे झाले, तर 'संत परंपरेतील शेवटचा महापुरुष म्हणजे साने गुरूजी होय.' असे म्हणावेसे वाटते.

●

**डॉ. द. ता. भोसले**
चलभाष : ९४२२६४६८५५



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद



आदरांजली

# माधवानुज : एक स्मरण

■ राजीव जोशी ■

**कवी माधवानुज यांनी मराठी कविता व अनुवाद क्षेत्रात महत्त्वाचे योगदान दिले आहे. यंदाचे वर्ष माधवानुजांचे स्मृतिशताब्दी वर्ष आहे. या निमित्ताने त्यांच्या वाङ्मयीन कार्यकर्तृत्वावर प्रकाश टाकणारा राजीव जोशी यांचा लेख.**



कवी माधवानुज म्हणजे डॉ. काशिनाथ हरी मोडक हे केशवसुत, रेव्हरंड टिळक, रेंदाळकर, तांबे यांचे समकालीन कवी. १६ मार्च १८७२ मध्ये पडघवली (तालुका सुधागड) येथे त्यांचा जन्म झाला आणि २ मार्च १९१६ मध्ये कल्याण येथे त्यांचे निधन झाले. म्हणजेच २०१६ हे त्यांचे स्मृतिशताब्दी वर्ष आहे. प्रख्यात आंग्ल कवी रॉबर्ट बर्न्स याच्या मृत्युशताब्दी वर्षात

(इ. स.१८९६) माधवानुजांनी त्याला उद्देशून लिहिलेल्या ओळी आठवतात : 'शंभर वर्षे जाहली कविवरा तू ते मरोनी पुरी। देई त्वत्कविता अजूनि हृदया आनंद माझ्या तरी।' जात, भाषा, धर्म, देशकाल या सर्वांच्या पलीकडे कविता हे एकमेव तत्त्व वा साधन परस्परांना बांधून ठेवते. आणि म्हणूनच रॉबर्ट बर्न्सला माधवानुज उद्देशून म्हणतात, 'वस्तू दोन परस्परा ज्या तत्त्वामुळे ओढिती। तत्त्वे त्याच रिघे कविवरा काव्यात माझी मती।'

माधवानुज व्यवसायाने डॉक्टर होते. वैद्यकीय शिक्षणाच्या बी.जे. मेडिकलमधल्या काळात (१८९१-९५ ) त्यांनी मराठीबरोबरच संस्कृत, इंग्रजी, बंगाली आदी भाषांचा अभ्यास केला, वाचन केले. मोरोपंत, शेक्सपियर, बायरन, लाँगफेलो, टेनिसन, रॉबर्ट बर्न्स यांच्या बरोबरीने बंकीमचंद्र, मायकेल मधुसूदन दत्त, रवींद्रनाथ टागोर यांचे लिखाण त्यांना अवगत होते. बंकीमचंद्रांच्या कृष्णा कांतेर वुईल या कादंबरीचा 'कृष्णाकांताचे मृत्युपत्र' असा अनुवादही त्यांनी केला होता. मधुसूदन दत्त यांच्या मेघनादवध या काव्याचे त्यांनी मराठीत भाषांतरही केले होते. वैद्यकीय व्यवसायानिमित्त ठाणे, मुंबई, सातारा, चाकण, पुणे आदी भागांत त्यांची भ्रमंती झाली आणि अशा प्रकारच्या भ्रमंती, बदलीस कंटाळून त्यांनी १८९९मध्ये कल्याणात स्वतःचा वैद्यकीय व्यवसाय सुरू केला. वैद्यकीय व्यवसायामुळे कवितेसारखा हवापालट करण्यासाठी काही काळ ते चाकण येथे वास्तव्यासही गेले होते, आणि आपल्या वडिलांच्या आकस्मित निधनाने त्यांना कल्याणात परतावे लागले होते. या दरम्यान मात्र टिळक, अनंततनय, पांगारकर आदी कवींच्या झालेल्या भेटीगाठी त्यांना काव्यलेखनास मोठी शिदोरी देऊन गेल्या होत्या.

माधवानुज तसे सर्वसामान्यांसारखे संसारी आणि प्रापंचिक. ते वैद्यकीय व्यवसायात असले तरी शारीरिक व्याधींनी त्यांचा पिच्छा पुरवलेला होता. जिवाला चैन नसल्याकारणाने संसारात त्यांचे चित्त फारसे रमले नाही. दुःख पाहताच मन द्रवावे व जीवनाच्या नश्वरतेची साक्ष पटून उदास व्हावे अशी त्यांची वृत्ती होती. ग. त्र्यं. माडखोलकरांनी 'कविता हा माधवानुजांचा दुय्यम व्यवसाय होता' असं म्हणताना लिहिलंय, की त्यांना कवितेची आवड होती, पण सर्व व्यवसायावर पाणी सोडून कवितेचं वेड त्यांनी कधी पांघरलं नाही. किंबहुना, बऱ्याच दिवसांत कविता लिहिली नाही म्हणून



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

**माधवानुजांची कविता व त्यांच्या समकालीन कवींच्या कवितांचा विचार केला तर असे लक्षात येते, की केशवसुतांनी मराठी कवितेला आधुनिकतेचे वळण दिले, विनायकांनी राष्ट्राभिमान जागृत केला, चंद्रशेखरांनी आत्मलक्षी व परलक्षी कविता संस्कृतप्रचुर भाषेत लिहिल्या, दत्तकवींनी आपल्या कवितेत समाजाचे दर्शन घडवण्याचा प्रयत्न केला, रेंदाळकरांनी जुन्या संस्कृत तसेच मराठी कवितांचा अनुवाद पांडित्यपूर्णतेने केला, बालकवींनी निसर्ग आपल्या कवितेत सचेतन केला, तर रेव्ह. टिळकांच्या कवितांनी रसिकांची मने जिंकली.**

तळमळणाऱ्या, उसासून कविता पाडणाऱ्या नादी कवींपैकी ते नव्हते.

माधवानुज जुन्या कवितांचे भोक्ते होते. नवीन कवींबद्दल त्यांना जरी अनादर नव्हता तरी त्यांचा ओढा कमीच होता. असे असूनही, केशवसुतांच्या कवितेविषयी त्या काळात इतका तीव्र मतभेद, मतप्रवाह असतानाही, त्यातल्या नावीन्याने येणारे चैतन्य ओळखून माधवानुजांनी त्यांचे अनुकरण केले. या ठिकाणी एक गोष्ट नमूद करायला हवी, की रेव्हरंड टिळक वा कवी विनायक यांच्या अनुकरणापेक्षा माधवानुजांचे अनुकरण महत्त्वाचे आहे. टिळकांचे अनुकरण तसे जुन्या पद्धतीने कविता न लिहिण्यापुरते मर्यादित होते. माधवानुज तसे बंडखोर कवी नव्हते किंवा त्यांच्यापाशी तसा लटका अभिनिवेशही नव्हता, पण केशवसुतांनी उभारलेल्या बंडाच्या झेंड्याखाली जे उत्साहात सामील झाले त्यात माधवानुज अग्रभागी होते. सुनीत हा काव्यप्रकार मराठीत प्रचलित व्हावा यासाठी केशवसुतांनी केलेल्या प्रयत्नांत माधवानुज आणि भा. रा. तांबे यांच्याकडून त्यांना प्रोत्साहन लाभले. माधवानुजांनीही निरनिराळ्या प्रकारची सुनिते लिहिली, त्यात भगवद्‌गीता, काल, कीर्ती व विस्मृती, जादूचा प्रभाव अशा सुनितांचा उल्लेख करता येईल. कवितेविषयीची तळमळ माधवानुजांच्या ठायी उपजत होती. त्यामुळेच त्यांच्या कवितेत नवीनपणा येत गेला, सामाजिकता येत गेली. किंबहुना, कळकळ आणि कळवळा यामुळे दुष्काळावरील गाणी, स्मृतिचित्रं, विसरलेले गाणे, स्मशानगीत या कवितांतील आशय आजही मनाला चटका लावणारा आहे.

माधवानुजांची कविता व त्यांच्या समकालीन कवींच्या कवितांचा विचार केला तर असे लक्षात येते, की केशवसुतांनी मराठी कवितेला आधुनिकतेचे वळण दिले, विनायकांनी राष्ट्राभिमान जागृत केला, चंद्रशेखरांनी आत्मलक्षी व परलक्षी कविता संस्कृतप्रचुर भाषेत लिहिल्या, दत्तकवींनी आपल्या कवितेत समाजाचे दर्शन घडवण्याचा प्रयत्न केला, रेंदाळकरांनी जुन्या संस्कृत तसेच मराठी कवितांचा अनुवाद पांडित्यपूर्णतेने केला, बालकवींनी निसर्ग आपल्या कवितेत सचेतन केला, तर रेव्ह. टिळकांच्या कवितांनी रसिकांची मने जिंकली. या पार्श्वभूमीवर, माधवानुजांच्या कवितेत कौटुंबिक जिव्हाळा प्रत्ययास येतो. त्यांच्या कविता जुन्या धाटणीच्या असल्या तरी त्यात कृत्रिमपणा नाही. नादमाधुर्य व शब्दांची समर्पक गुंफण यामुळे त्यात क्लिष्टपणा नाही आणि बहुतेक कवितांत कारुण्यता सहजपणे आलेली आहे.

व्यवसायामुळे समाजातल्या तळागाळातल्या लोकांशी होणाऱ्या संवाद तसेच अभ्यास, चिंतन इतर भाषेतल्या कवी आणि कवितांचा विमर्श यामुळे माधवानुजांच्या कवितेत काव्यात्मक प्रगल्भता आहे. कौटुंबिक कवितांबरोबर निसर्ग, पाने-फुले जसे त्यांच्या कवितेत येतात, त्याचप्रमाणे दुष्काळ, गरिबी यावरच्या त्यांच्या कविता प्रगल्भ सामाजिक दृष्टीचे प्रतीक आहे, साक्ष आहे. एकोणिसाव्या शतकातला दुष्काळ, दुष्काळग्रस्त शेतकऱ्यांच्या व्यथा यांना चपखलपणे लागू व्हाव्या यातच माधवानुजांचे प्रगल्भ सामाजिक भान दिसून येते, त्यांचा द्रष्टेपणा दिसून येतो. दुष्काळग्रस्तांचे सुस्कारे या कवितेत माधवानुज म्हणतात,

*'औते गेली, शेते गेली, बैलही गेले ते मरोनि, घरात वाजे नकारघंटा गेली शक्ती मम हरुनि। कामासाठी वणवण फिरतो सोय न लागे कुठे परी, धनिक जनाच्या जवळी जाता टोचुनि वदती परोपरी ॥'*

आजही शेतकऱ्यांच्या एकूण जगण्याबाबत समाजाची, सरकारची आणि पर्यायाने समाजातली धनिकवर्गाची उदासीनता कायम आहे. अशा मानसिकतेत जीव देण्याचे, आत्महत्येचे विचार त्याच्या मनात येणे साहजिकच आहे.

*'हरहर देवा किती हेलना होत असे या दीनाची, वसुंधरे आपुले दरवाजे, येतो, आलो, बघ हे जननी टाकुनि देहाचे ओझे ॥'*

अतिशय सुन्न करणारी ही कविता वाचताना शंभर-सव्वाशे वर्षांपूर्वी ती माधवानुजांनी लिहिलेली आहे आणि आजच्या वास्तवालाही ती लागू पडावी हे थक्क करणारे आहे.

भाषांतर, अनुवाद हे माधवानुजांचे आणखीन एक



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

वैशिष्ट्य आहे. रवींद्रनाथ टागोर, बंकीमचंद्र, मधुसूदन दत्त यांच्या लिखाणाचे अनुवाद करून त्यांनी मराठी साहित्यात मोठीच भर घातलेली आहे. मधुसूदन दत्त यांच्या मेघनाथवधच्या भाषांतराचे वैशिष्ट्य म्हणजे ते अमित्राक्षरछंदात म्हणजे निर्यमक असूनही माधवानुजांनी ते समयक केलेले आहे. आर्यावृत्त मोरोपंती घाटाचे आहे. मात्र, माधवानुजांची यमके क्लिष्ट वा कर्णकटू नाहीत. माधवानुजांनी रवींद्रनाथ टागोर यांच्या 'गीतांजली'तील काही कवितांचा अनुवाद केलेला आहे. या ठिकाणी एक गोष्ट सांगावीशी वाटते की माधवानुजांच्या ठायी असणारा शांत व प्रेमळरस आणि गीतांजलीतला विरागी भक्तीचा गंभीर प्रेमळपणा यांचा सुंदर मिलाप झाल्याने हा अनुवाद मराठीतल्या उत्तम अनुवादांत गणला जातो.

१९०३ मध्ये माधवानुज वडिलांच्या आकस्मित निधनाने कल्याणात परतले होते. दरम्यानच्या काळात रेव्ह. टिळक, पांगारकर, अनंततनय आदी कवींच्या भेटी आणि कवितेवरील चर्चा त्यांच्या काव्यलेखनाला प्रोत्साहित करून गेल्या, नवीन ऊर्जा देऊन गेल्या होत्या. अर्थात काव्यलेखन चालूच असले तरी व्यवसायाचा ताप, प्रापंचिक अडचणी आणि प्रकृतिअस्वास्थ्य यांनी त्यांना घेरले होते.

१९१५ साल त्यांच्यासाठी खडतर निघाले. शारीरिक अस्वास्थ्य वाढू लागले होते आणि हवापालट करण्यासाठी तळेगाव-चाकणच्या फेऱ्या वाढल्या होत्या. मात्र, काही महिन्यांतच त्यांना कल्याणात परतावे लागले. नोव्हेंबरपासून त्यांना श्वासोच्छ्वासाचा त्रास वाढू लागला. त्यातच प्लेगच्या प्रादुर्भावामुळे गावाबाहेर स्थलांतर करण्याची वेळ आली. रोग आणि परिस्थितीशी लढता लढता २ मार्च १९१६ रोजी माधवानुजांचं कल्याणात निधन झाले. माधवानुज देहाने गेले असले तरी नवकवितेची तुतारी ज्या काळात फुंकली गेली त्या काळातल्या कवी आणि कवितांमध्ये, अनुवाद आणि भाषांतराच्या क्षेत्रात मोठे काम माधवानुजांनी केले होते. पाठ्यपुस्तकात एके काळी त्यांची 'जाईची फुले' ही कविता अभ्यासक्रमात होती. त्यात म्हटल्याप्रमाणे *'रूप मनोहर असुचे दिसते, परि ते तसे न रहायाचे। जग हे असार सारे जे दिसते ते अखेर जायाचे ।।'*

जे दिसते ते गेले असले, तरी माधवानुजांची कविता, सुनिते, अनुवाद आणि भाषांतर सदैव मराठी साहित्य आणि रसिकांना सोबत असतील हेच खरे.

●

**राजीव जोशी**
चलभाष : ९५०४०७४४५३


प्रा. भगवान भोईर

सुप्रसिद्ध ज्येष्ठ साहित्यिक, विचारवंत आणि समीक्षक
**प्रा. भगवान भोईर**
यांच्या वैचारिक ग्रंथांनी महाराष्ट्रात प्रबोधनाचे नवे पर्व सुरू केले आहे.
**१. विच्छेदन**
**२. शब्दांगार** (अस्मितादर्श व निळाई पुरस्कार)
**३. पहाट प्रबोधनाची** (अण्णाभाऊ साठे पुरस्कार, नांदेड)
**हे तीन ग्रंथ मूळ ४५० रु. किमतीचे केवळ ३०० रुपयांत घरपोच मिळतील.**
**महाराष्ट्राचा सांस्कृतिक चेहरा**
हा नवा ग्रंथ प्रसिद्ध झालाय.
महाराष्ट्र शासनाच्या सांस्कृतिक धोरणाची व महिला धोरणाची परखड चिकित्सा करणारा हा **ग्रंथ ५० रुपयांत घरपोच मिळेल. मूळ किंमत १०० रु.**
**संपर्क**
प्रा. भगवान भोईर, तुलसी विहार, डी-२/१०२, पहिला मजला, गोकुळनगरी, खडकपाडा, कल्याण (प.),जिल्हा ठाणे, मोबाइल क्रमांक : ९२२२२३०३०४ / ९२२४२३२०३०



अनुक्रमणिका


राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद



आदरांजली

■ अरुण कोळेकर ■

प्रसिद्ध लेखक गो. नी. दांडेकर यांचे हे जन्मशताब्दी वर्ष आहे. या निमित्ताने त्यांच्या ललित लेखनावर प्रकाश टाकणारा अभ्यासक डॉ. अरूण कोळेकर यांचा लेख इथे प्रसिद्ध करीत आहेत.





# गो. नी. दांडेकर यांचे ललित लेखन

गोपाल नीलकंठ दांडेकर तथा गो. नी. दांडेकर (जन्म ८ जुलै १९१६, मृत्यू १ जून १९९८) यांचे हे जन्मशताब्दी वर्ष आहे.

गो. नी. दांडेकरांनी आपल्या जीवनभराच्या साहित्यप्रवासात अनेकविध स्वरूपाचे लेखन केले. आपणाला ते एक सिद्धहस्त, शैलीदार कादंबरीकार म्हणून सर्वपरिचित आहेत. त्याशिवाय त्यांनी चरित्र, आत्मचरित्र, ललित लेखन, चित्रपट कथालेखन, कुमारांसाठीचे लेखन केले आहे हे आपणा सर्वांना माहीत आहे. प्रारंभी ते म. गांधींच्या चळवळीकडे काही काळ आकर्षित झाले. पुढे ते गाडगेबाबांच्या सहवासात राहून त्यांच्याबरोबर कीर्तनेही करू लागले. संतसाहित्य आणि शरदचंद्र चट्टोपाध्याय यांच्या साहित्याच्या वाचनाने ते प्रभावित झाले. त्याचा काही एक प्रभाव त्यांच्या एकूणच साहित्यावर असल्याचे जाणवू लागले. भ्रमंती हा त्यांचा श्वास, प्राण होता. त्यातून गाठीशी आलेले बहुविध जीवनानुभव आपल्या लेखनातून त्यांनी अभिव्यक्त केले. त्यांनी केलेल्या साहित्यनिर्मितीतून जी अनुभवसंपन्नता वाचकांच्या वाट्याला येते ती अजोड अशी आहे. त्यांच्या लेखनात, विशेषतः कादंबरीत निसर्गाची असणारी मनस्वी अशी आदिम ओढ, स्थलकालाशी एकजीव होऊ पाहणारे सहृदय मन, व्यक्तिप्रधानता ही त्यांच्या कादंबरीची वैशिष्ट्ये आहेत. त्याशिवाय विशिष्ट प्रदेश आपल्या लेखनसामर्थ्याने, जनसमूहास सजीव करण्याचे कसब त्यांनी कादंबऱ्यांतून वाचकांना दाखविले आहे. त्यामुळे आजही त्यांच्या लेखनावर लुब्ध होणारे मराठी वाचक आणि रसिक आहेत.

प्रस्तुत लेखात 'गो. नी. दांडेकरांचे ललित लेखन' या विषयावर प्रकाश टाकण्याचा प्रयत्न केला आहे. त्यांचे ललित लेखन 'दुर्गदर्शन' (१९७३), 'छंद माझे वेगळे' (१९७९), 'दुर्गभ्रमणगाथा' (१९८३), 'मावळतीचे गहिरे रंग' (१९८७) आणि 'त्रिपदी' (२०००) या संग्रहांमधून वाचकांसमोर वेळोवेळी आले आहे.

मराठी ललित लेखनाला त्याची म्हणून काही एक परंपरा आहे. ती परंपरा समृद्ध करीत, नवे काही निर्माण करू पाहत गो. नी. दांडेकरांनी आपले ललित लेखन भावरम्य करण्याचा प्रयत्न केला आहे. मराठी ललित लेखनाने अनेक वाटा आणि वळणे अनुभवीत आपला प्रवास केला आहे. विषयांची विविधता, नावीन्य, नवे नवे प्रयोग, जीवनानुभवाची अनोखी दालने किलकिली करीत, कधी थेट प्रवेश करीत आपल्या अनुभवाचे लालित्यपूर्ण, काव्यात्म, वैचारिक दर्शन मराठी ललित लेखनाने आजवर घडविले आहे. त्याचा साहित्यप्रवास आपणासमोर आजही आहे.







अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

अशा मराठी ललित लेखनाच्या वाटचालीमध्ये गो. नी. दांडेकरांचे ललित लेखन मैलाचा दगड, टप्पा ठरले आहे. त्यांचे ललित लेखन भटकंतीतून वेचलेले अनुभवाचे सोनेरी क्षण आणि आयुष्यभर निर्लेपवृत्तीने विविध छंद जोपासलेली त्यांची जिज्ञासू व कुतूहलपूर्ण रसिकवृत्ती आपणाला मोह घालते, अचंबित करते. महाराष्ट्राच्या गड-कोटांचे, दुर्गवैभवाचे ललित लेखन मराठी ललित साहित्यातील अनोखे विश्व, दालन उलगडणारे ठरले आहे. दुर्ग, किल्ले हा तसा इतिहासाचा प्रांत; पण त्यालाही ललित लेखनाच्या प्रांतात आणून ठेवण्याचे श्रेय जाते ते गो. नी. दांडेकरांकडे. आपल्या इतिहासकालीन वैभवाची साक्ष देणारे पण दुर्लक्षित असे गड-किल्ले, तटबंद्या, दऱ्या-खोऱ्या यांच्याशी त्यांचे एक घट्ट नाते जडले. त्याचा त्यांना लळा लागला, नाळ जमली. ते त्यांच्या प्रेमाचा, आस्थेचा आणि पुढे लेखनाचा विषय झाले. याची साक्ष त्यांनी शब्दांकित केलेल्या 'दुर्गदर्शन' (१९७३) आणि 'दुर्गभ्रमणगाथा' (१९८३) यामधील ललित लेखनातून पटते. त्यातून जाणवते ती असीम अशा निष्ठेने, श्रद्धेने, सातत्याने केलेली अनेक वर्षांची भटकंती, भ्रमंती. त्या जगावेगळ्या भटकंतीला, अनुभवाला शब्दांचे कोंदण लाभले. भटकंतीत रायगड, राजगड, तोरणा, शिवनेरी, कर्नाळा, पन्हाळा, हरिश्चंद्र दुर्ग, पुरंदर असे किती तरी गड-कोट त्यांनी पालथे घातले. त्या सगळ्याकडे त्यांची पावले वळली. ती तिथे थबकली. त्यांनी घडविलेले हे दुर्गदर्शन म्हणजे केवळ दुर्गांच्या अवशेषांची, त्यांच्या दुरवस्थेची ऐतिहासिक माहिती नाही, तर त्या गड-कोटांवर इतिहासात घडून गेलेल्या घटनांचे, प्रसंगांचे भावात्मक असे दर्शन आहे. ते त्यांनी सर्जनशील लेखक म्हणून त्यांच्या मनात सतत जागे ठेवले होते. जाईल त्या ठिकाणच्या किल्ल्याचा केवळ इतिहास नव्हे तर भूगोलही ते न्याहाळत, अभ्यासत. त्यांच्याकडे केवळ पर्यटकाची दृष्टी नव्हती; तर मुळात तिथल्या परिसराशी एक जिव्हाळा, ऋणानुबंध होता. त्यातून आलेले त्यांचे हे ललित लेखन आहे.

कोणाचेही लक्ष जाणार नाही अशा सिंहगडावरच्या देवटाक्यामधील रुचकर, पाचक आणि पथ्यकर पाणी पिण्याच्या लोभाने ते अनेकदा सिंहगडावर गेले आहेत. लोहगडाची प्रवेशद्वारे इतकी मजबूत की अशी द्वाररचना दुसरीकडे कुठेही नाही. लोहगडावर ज्या वाटेने ते जाणार असतात त्याच वाटेने कुबेराघरची संपत्ती चढली-उतरल्याची आठवण त्यांच्या मनात जागी झाल्याशिवाय राहत नाही. पवना खोऱ्यातील खडान्‌खडा, तळहाताच्या रेषेसारखी माहिती त्यांना होती. त्या खोऱ्यातील भौगोलिक आणि नैसर्गिक दृश्यात्मकता नजरेसमोर जशीच्या तशी उभी राहते. कुठे काय सापडू शकते याचा अंदाज बांधणारी नजर, दृष्टी त्यांच्या ठायी होती. या भ्रमंतीत भेटलेली माणसे; त्यांचे अगत्यशील, सौजन्यपूर्ण वागणे मनात घर करून राहते. राजगडची बुलंद बांधणी, मजबूत तट, बेलाग बुरूज जणू काही शिवछत्रपतींच्या असीम कर्तृत्वासारखे वाटू लागतात. छत्रपती शिवरायांच्या आणि जिजाऊ यांच्या वास्तव्याच्या पाऊलखुणा यामुळे राजगड सजीव होतो. छ. शिवाजी राजे तीस वर्षे जिथे राहिले त्या राजगडाची झालेली दुर्दशा त्यांना अस्वस्थ करून सोडते, तशीच तोरणा किल्ल्याची भग्नावस्था त्यांचे काळीज विदीर्ण करून जाते. अणुयुगात दुर्गपणाचे काय मोल, असे त्यांना वाटू लागते. पाश्चात्यांनी आपली स्फूर्तिस्थाने जिवापलीकडे जपली ते एकदा अनुभवून या, म्हणजे आपल्या उदासीनपणाचे दर्शन घडेल.

या भटकंतीत औदासीन्य विरून जाते. एखाद्या नव्या पिसाट-वाऱ्याची झुळूक रायगडाकडून येते आणि शरीर मोहरवून जाते. पायांना जणू दमदार पंख फुटतात. चालणे जणू तरंगणेच होऊन जाते. सह्याद्रीचे प्रचंड असे दुर्गम तट, तिथली कावल्या-बावल्याची खिंड. जसे अनेक स्थानांचे स्फूर्तिप्रद इतिहास अज्ञात राहतात, तसेच या खिंडीचे. तुंगारण्यातील कारतलबखानाची खिंड क्वचित माहीत असते. तिच्या कुशीत मूठभर मावळ्यांनी गाजवलेला अपूर्व पराक्रम इतिहासालाही माहीत नसतो, तिथे त्यांची पावले वळतात, विसावतात.

गड-कोटांच्या भ्रमंतीत गो. नी. दांडेकर तिथल्या इतिहासाशी, सभोवतालच्या निसर्गाशी आणि तिथे राहणाऱ्या, वावरणाऱ्या सामान्य माणसांच्या जीवनाशी, अनुभवाशी एकरूप होऊन जातात. ती त्यांची स्वाभाविक अशी वृत्ती आहे. त्या स्वभाववृत्तीचा ठायी ठायी प्रत्यय या लेखांतून येतो. त्यांच्या या सहज, स्वाभाविक मनःप्रवृत्तीला साथ मिळाली ती त्यांच्याकडे असणाऱ्या संवेदनशील आणि भावोत्कट मनाची. त्या मनाचीच भावरूपे वाचकांना आपला अनुभव सांगतात. त्या सांगण्याच्या ऊर्मीतूनच हे ललित लेखन आकाराला येते. गो. नी. दांडेकर निसर्ग पाहत नाहीत, तर तो अनुभवतात. निसर्गाच्या चैतन्यमय अशा जाणिवेच्या क्रीडा ते अनुभवतात. त्याच्याशी एकरूप होतात. ही त्यांची वृत्ती लेखनात प्रकट झाली आहे. परिसरातील माणसे,



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

त्यांच्या जगण्याच्या रीतिभाती, त्यांची बोलीभाषा ते जाणून घेतात, आणि त्यांच्याशी त्याच बोलीत, भाषेत बोलतात. खास अशा मऱ्हाटी वळणाच्या ललितरम्य शैलीमुळे त्यांचे अशा प्रकारचे ताजे अनुभवविश्व मराठी गद्यसृष्टीत अनोखे ठरले आहे. एवढेच नव्हे, तर त्यांच्या या भ्रमंतीच्या, दुर्गदर्शनाच्या अनुभवविश्वाच्या शब्दांकनाने एक परंपरा पुढे मराठी ललित लेखनात निर्माण करून ठेवली.

आपल्या ललित लेखनातून गो. नी. दांडेकरांनी हा भवताल संवेदनशील मनाने, काव्यात्म मनोवृत्तीने टिपला आहे. लेखक निसर्गाकडे, विविध स्थळांकडे, माणसांकडे, इतिहासाकडे शोधक दृष्टीने, आत्मीयतेने पाहतो. निसर्गाला, इतिहासातील घटितांना शब्दबद्ध करणाऱ्या तरल, संवेदनशील मनाचे दर्शन या लेखनातून घडते. हे लेखन म्हणजे सृष्टीचे नानाविध विभ्रम आहेत. त्यातून त्यांच्या बहुश्रुतपणाचे आणि सर्वस्पर्शित्वाचे दर्शन घडते. या सगळ्यांतून जे चिंतन घडते त्या चिंतनाची जोड लेखनाला मिळत राहते. अनेक ठिकाणांचे तपशील, त्यातून आलेले अनुभव यामध्ये वाचकांना सामील करून घेत, आपलेसे करीत ते संवादी होतात. गडकोटांची केलेली सूक्ष्म निरीक्षणे शब्दांतून उमटत राहतात. त्यामुळे लेखनातील तपशील, बारकावे कधी कंटाळवाणे होत नाहीत. उलट, त्यामधून एका संशोधकाचे, शोधकवृत्तीच्या अभ्यासकाचे, इतिहासाला मिळालेल्या काव्यात्मतेचे दर्शन घडत राहते.

गड-किल्ल्यांच्या, सह्याद्रीच्या रांगांच्या, दऱ्या-खोऱ्यांच्या दृश्य प्रतिमा डोळ्यांसमोर उभे करण्याचे सामर्थ्य त्यांनी उभ्या केलेल्या शब्दशिल्पांमधून जाणवते. हे केवळ दूरदर्शन नव्हे तर 'दुर्गदर्शन' आहे. दुर्गभ्रमंतीच्या निमित्ताने त्यांनी केलेले हे ललितरम्य लेखन अनोखे ठरले आहे. त्यांनी महाराष्ट्रातल्या गड-किल्ल्यांवर मनस्वी असे प्रेम केले. हे दुर्ग आपल्या गतवैभवाचे आणि इतिहासाचे साक्षीदार आहेत असे त्यांना वाटते. त्यांनी या लेखनप्रकारातून त्यांच्या मनातील ऐतिहासिक काळातील विश्व साकार, जिवंत झाले आहे. अनेक किल्ले भग्नावस्थेत असले तरी ते त्यांच्याशी बोलू लागतात, संवाद करतात. केवळ किल्लेच नव्हे, तर भवतालचा निसर्ग, त्याचे नानाविध विभ्रम त्यांना मोह घालतात. त्यातून त्यांचे भावजीवन संपन्न झाले. त्या जीवनाचे ते ललितरम्य अशा शैलीतील लेखन म्हणजे गो. नी. दांडेकरांनी केलेले ललित लेखन होय. त्यांचे हे लेखन मराठी साहित्यविश्वात अनोखे, वेगळे ठरले आहे. अशा लेखनाची सुरवात मात्र गो. नी. दांडेकरांनी केली. त्यामुळे आजही गड-कोट पालथे घालणाऱ्या, धुंडणाऱ्या कोणालाही त्यांच्या लेखनामुळे एक नवी दृष्टी, जाण मिळाली आहे.

गड-किल्ल्यांच्या, सह्याद्रीच्या रांगांच्या, दऱ्या-खोऱ्यांच्या दृश्य प्रतिमा डोळ्यांसमोर उभे करण्याचे सामर्थ्य त्यांनी उभ्या केलेल्या शब्दशिल्पांमधून जाणवते. हे केवळ दूरदर्शन नव्हे तर 'दुर्गदर्शन' आहे. दुर्गभ्रमंतीच्या निमित्ताने त्यांनी केलेले हे ललितरम्य लेखन अनोखे ठरले आहे.




गो. नी. दांडेकरांनी जसे हे दुर्ग ललित लेखन केले, तसेच काही आत्मपर, व्यक्तिविषयक आणि ललित अशा प्रकारांतीलही लेखन केले. मुळात हा लेखक बहुआयामी, बहुप्रसव होता. त्यांच्या 'त्रिपदी' (२०००)सारख्या ललितरम्य लेखांतून समृद्ध अशा जीवनानुभवाचा आविष्कार शब्दांकित झाला. गो. नी. दांडेकर मुळात कलंदर वृत्तीचा माणूस. अशा त्यांच्या या स्वभावाचे दर्शन 'त्रिपदी'मधील काही आत्मपर लेखनातून घडते. त्यांच्या जगण्याचा, जीवनविषयक दृष्टींचा परिचय करून घेण्यास 'त्रिपदी'मधील लेखांची मदत होते. एकूण सत्तावीस लेखांचा संग्रह 'त्रिपदी'मध्ये आहे. त्यातला प्रत्येक लेख वाचकाच्या मनाची घट्ट पकड घेतो.

'औंधातल्या दिवसा'च्या आठवणी त्यांनी उलगडून सांगितल्या आहेत. तिथल्या औंधच्या राजांचे निःस्पृह सल्लागार पंडित सातवळेकर यांचे काही संस्कार लेखकावर झाले. रोमांचक दिवसांच्या आठवणींचं अनुभवकथन प्रवाही केलं आहे. तो काळ, समाज, वातावरण, परिस्थितीचे, जाती-जमातींचे विलक्षण अनुभव त्यांच्या गाठीशी आले. त्या सगळ्यांचे मनोज्ञ दर्शन त्यांनी घडविले. तिथेच त्यांनी गजाननबुवा जोशींची सुरांनी दाटलेली गच्च रात्र अनुभवली. म. गांधीजींच्या हत्येच्या प्रसंगावेळी जी दंगल पेटली त्या वेळी ज्यांनी त्यांना अभय दिले त्यांच्याविषयीचा कृतज्ञताभाव ते व्यक्त करतात. काही दिवसांनी औंध सुटले, परंतु मनात एक वेगळा भाव कायम स्मरणात राहील असा चिरस्मरणीय झाला तो या लेखाच्या माध्यमातून.

आपल्या आईच्या स्वभाववैशिष्ट्यांचा, तिच्या शिस्तीचा, धैर्याचा, कर्तबगारीचा आणि तेजस्वीपणाचा



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

आठव ते 'माईची आई'मधून करतात. आपल्या फकीरवृत्तीला, उघळ्या स्वभावाच्या माणसाला आपलेसे केले, अशा सामाजिक ऋण मानणाऱ्या पत्नीविषयीच्या कृतज्ञभावनेचे मनोज्ञ दर्शन 'माझी बायको' या लेखातून घडते. 'मर्मबंधातली ठेव'मधून आशा भोसले आणि मंगेशकर कुटुंबीय यांच्याशी असणारा स्नेहभाव प्रकट झाला आहे. 'तिच्या हलक्या-फुलक्या गीतांवरून कुणी तिची परीक्षा करू नये', ('त्रिपदी', पृ. ५९ ) एवढे एक वाक्य आशा भोसले यांची जीवनकहाणी सांगून जाते. 'खंडू गोमा उंबर' या सामान्य खेडूत माणसाशी अप्पांचा स्नेह जुळला. त्याच्याशी मैत्रभाव जपला तो अखेरपर्यंत. लता मंगेशकरांविषयीचा 'समर्पिता' हा भावपर लेख मनाला स्पर्शून जातो. त्यांच्याविषयीच्या स्नेहभारल्या आठवणीत वाचकही चिंब भिजून जावा असा रसिला, भावविभोर उतरला आहे. गो. नी. दांडेकरांना संत गाडगेबाबांचा मिळालेला सहवास आणि डॉ. बाबासाहेब आंबेडकरांविषयीची विलक्षण ओढ त्यांनी 'बोधीवृक्षाच्या छायेत' व्यक्त केली. आंबेडकरांवर आणि पूर्वाश्रमीच्या त्यांच्या लोकांवर हिंदुधर्माने केलेला अन्याय यामुळे ते किती व्यथित होतात हे हा लेख वाचल्याशिवाय समजणार नाही. अशाच एका अनेकानेक दुर्मिळ वस्तूंचा संग्रह करणाऱ्या अण्णा शिरगावकरांशी त्यांची भेट होते आणि मैत्र जुळते. पंडित श्रीपाद दामोदर सातवळेकर या कर्मयोग्याविषयी, त्यांच्या कार्याविषयी 'शतायु कर्मयोगी'मधून लिहिले आहे. ग. दि. माडगूळकरांच्या जाण्याने 'अजानवृक्ष उन्मळला' अशा भावना दाटून येते. 'रावा उडून गेला' ही त्यांच्याविषयीची भावना आपल्याही मनात कालवाकालव करून जाते.

'मी तळेगावी एका लहानशा पत्र्याच्या घरात वरच्या मजल्यावर राहत असे. एकच बैठकीची खोली आणि स्वयंपाकघर. बस, एवढेच त्या घराचे स्वरूप. त्या लहानशा घरात माझे बहुधा सर्व लेखन झाले.' ('त्रिपदी', पृ. १०८) ही आठवणही वाचायला मिळते. परिणतप्रज्ञ सोनोपंत दांडेकर यांनी लिहिलेल्या जोग महाराजांच्या चरित्रलेखनासाठी आपण 'लेखकू' झाल्याचे भाग्य मिळाले, याची कृतार्थता तर आहेच, पण सोनुमामा हा आळंदीस्थ सोन्याचा पिंपळ कोसळून पडल्यामुळे आपण कसे पोरके झालो हे सांगतानाही शब्द थिजून जातात, याची प्रचिती 'सोन्याचा पिंपळ' या ललित लेखातून येते. 'ऋणानुबंध'मधून मॅजेस्टिक प्रकाशनाचे केशवराव कोठावळे यांच्याशी असलेले अनोखे मैत्र साकारले आहे. लेखक आणि प्रकाशक यांच्या पलीकडचे नाते शब्दातीत कसे असू शकते हे अनुभवयास मिळते. आपल्या अगोदर केशवरावांचे 'जाणे' त्यांना हेलावून सोडते. 'प्रस्थान'सारख्या ललित लेखनातून माउलींच्या (संत ज्ञानेश्वरांच्या) प्रस्थानाचा सोहळा, त्यामधला आनंदकल्लोळ 'याचि देहि याचि डोळा' अनुभवतात. त्याचा प्रत्यय या ललित लेखात येतो. त्यातून १९३३ मधील आळंदीचे एक शालीन, सोशिक दर्शन घडते. 'दाभोळ'च्या निसर्गाचे नयनमनोहारी अनुपमेय असे दर्शन घडवितात. त्या बंदरातले देखणे सौंदर्य आपल्याही मनभर पसरत राहते. निसर्गाचे देखणे रूप पाहायला ते राजगडावर जातात. भाद्रपदातला राजगड कसा अक्षरशः फुलारून येतो हे ते सांगतात. 'शपथ आकाशाची'मधून निसर्गाच्या विलोभनीय रूपाचे नानाविष्कार वाचकाच्या मनाच्या पृष्ठभागावर प्रतिबिंबित होतात. त्याचाच भावाविष्कार यामधून होतो.

गो. नी. दांडेकरांचे 'हिंडणे माझे दिवाणे' कसे होऊन जाते याचा प्रत्यय पुढील वर्णनशैलीतून येतो : '...अन् अचानक जाग येते कुण्या रानपाखरांच्या चिवचिवीने. काही क्षणांतच सगळे रान जागे होते. अवघ्या पक्षिकुळाला कंठ फुटतात. खर्जापासून तारसप्तकापर्यंतच्या सर्व स्तरांतील पक्षिकूजिते कलरवू लागतात.' ('त्रिपदी', पृ. १२७.)

'छंद माझे वेगळे' (१९७९) या लेखसंग्रहातून गो. नी. दांडेकर आयुष्यभर ज्या नाना छंदांमागे धावत राहिले त्या छंदांचे रम्य असे क्षण त्यांनी टिपले आहेत. छांदिष्ट माणसांचे त्यांचे म्हणून एक स्वतःचे जगणे असते. त्या जगण्याची एक धुंदी, मस्ती असते. असे एक, इतरेजनांहून वेगळे जगणे ते अनुभवतात. त्यांनी या लेखांमधून जगावेगळ्या छंदांचे अनोखे जग बालसुलभवृत्तीने उलगडून सांगितले आहे. त्यांच्या नादिष्टपणाची, छांदिष्ट जगण्याची रहस्ये वाचता वाचता आपणही एकरूप होऊन जातो. छंदांचा हा खुळा नाद त्यांनी मनोभावे जपला, जोपासला, वाढविला. छायाचित्रणाचा, नाणी जमविण्याचा, नानाविध दगड गोळा करण्याचा, मूर्तींचा संग्रह करण्याचा, भटकंतीचा छंद या सगळ्यांच्या मागे असते नवे काही शोधायची वृत्ती, सजग दृष्टी. झाडाझुडपाशी असणारे मैत्रभाव त्यांनी छंद म्हणून जोपासले. झाडे म्हणजे त्यांच्या 'जीवीचे मर्म' ठरतात. शस्त्रसंभाराचा छंद त्यांनी जोपासला, तो हाताळला तोही काडीमात्र उपयोग न करता. छायाचित्रणाच्या छंदातून तहानभूक हरपून रानाचे पुष्पवैभव आणि निसर्गसौंदर्य निरखण्यात तासन्तास घालविणारे गो. नी. दांडेकर या पुस्तकात भेटतात. नानाविध फुलाचे अनोखे जग त्यांनी पाहिले, अनुभवले आणि कॅमेऱ्यात टिपून घेतले. त्यासाठी अंगी बावरलेपण लागते. ते जात्याच असल्यामुळे उत्तम



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

छायाचित्रणाचा छंद जडला, जोपासला.

या साऱ्यामधून आपणाला जाणवत राहते ते एका छांदिष्ट भ्रमंतीकाराला लाभलेले समृद्ध असे जीवन. त्यांचे ललित लेखन म्हणजे निर्हेतुक भटकण्यातली किती तरी स्मरणे आहेत. त्या भटकण्यामागे कोणताही हेतू नाही. ही भटकंती जीवनाशी इतकी एकरूप झाली की सांगता सोय नाही. हे भटकणे त्यांच्या रक्तात रुजले. 'भ्रमण' ही एक वृत्ती आहे. ते एक अस्तित्व आहे. हा झरा मूळचाच असावा लागतो. ही वृत्ती आपल्यामध्ये असल्यामुळे स्वतःला गो. नी. दांडेकर 'भाग्यवान' समजतात. त्यांनी आपल्या जगण्याला, आलेल्या जीवनानुभवाला आपल्या खास शैलीत शब्दरूप दिले. त्यांनी भाषेचा वापर कुशलतेने केला. त्यांचे ललित लेखन वाचकांना उत्कटतेचा अनुभव देते. लेखनातील दृश्यात्मकता डोळाभर, मनभर तरळत राहते. हे लेखन शब्द, स्पर्श, रूप आणि गंध या संवेदनांचा अनुभव देऊन जाते. प्रासादिक शैलीतील सहज संवादी, हितगुज करणारे त्यांचे ललित लेखन वाचकांना भावनांची, विचारांची दिशा देऊन जाते. हे सगळे लेख सौंदर्यपूर्ण जीवनानुभवाचे ललितरम्य कवडसे दाखवितात. ललित गद्याच्या बंधमुक्त आविष्काराचे सहजसुंदर शब्दरूप म्हणजे गो. नी. दांडेकरांचे ललित लेखन होय. संवेदनशील अशा मनाने आणि काव्यात्म मनोवृत्तीने टिपलेला हा भवताल वाचकांना आपलासा करतो. यातच त्यांच्या लेखनसृष्टीचे वेगळेपण आहे.

शेवटी ललित लेखन म्हणजे तरी काय असते? 'लेखकाचे त्याला जाणवलेले अर्थ, संवेदना, भावना, वास्तव, नाट्य, प्रतिमा, चिंतन, मत यांचा शब्दांतून भावानुवाद करणे आणि वाचकांनाही ते आस्वाद्य होईल असे शब्दबद्ध करणे म्हणजे ललित लेखन होय.' ('दशदिशा'- छाया महाजन.) या सर्व कसोटीला गो. नी. दांडेकरांचे ललित लेखन उतरले आहे असे आपणास म्हणता येईल.

●

**डॉ. अरुण कोळेकर**
चलभाष : ९४२०७२५५१०

(सावित्रीबाई फुले महिला महाविद्यालय, तळेगाव दाभाडे, मराठी विभागाने आयोजित केलेल्या 'गो. नी. दांडेकरांचे समग्र साहित्य' या राज्यस्तरीय चर्चासत्रामध्ये (१७,१८ फेब्रुवारी २०१६) वाचलेला शोधनिबंध.)

**लेखासाठी वापरलेले संदर्भसाहाय्य:**

१. गो. नी. दांडेकर, 'दुर्गदर्शन', मृण्मयी प्रकाशन, २०१२.
२. गो. नी. दांडेकर, 'छंद माझे वेगळे', मॅजेस्टिक पब्लिशिंग, २०१२.
३. गो. नी. दांडेकर, 'त्रिपदी', मृण्मयी प्रकाशन, २००८
४. (संपादक) प्रभा गणोरकर व इतर, 'संक्षिप्त मराठी वाङ्मयकोश', जी. आर. भटकळ फाउंडेशन, मुंबई २००४
५. मराठी वाङ्मयाचा इतिहास (खंड ७ वा), म.सा.प. प्रकाशन.
६. छाया महाजन, 'दशदिशा', रजत प्रकाशन, औरंगाबाद.
७. आनंद यादव, 'ललित गद्याचे तात्त्विक स्वरूप आणि मराठी लघुनिबंधाचा इतिहास', मेहता पब्लिशिंग हाऊस, १९९५.

## साहित्य अकादमी पुरस्काराबद्दल मनःपूर्वक अभिनंदन!


राजीव तांबे


बलवंत जेऊरकर


मनस्विनी लता रवींद्र

ज्येष्ठ साहित्यिक राजीव तांबे यांना मराठी बालसाहित्याच्या प्रांतात दिलेल्या मौलिक योगदानासाठी, अनुवादक बलवंत जेऊरकर यांना अनुवादासाठी, तसेच युवा लेखिका-नाटककार मनस्विनी लता रवींद्र यांना 'ब्लॉगच्या आरश्यापल्याड' या शब्द पब्लिकेशनने प्रकाशित केलेल्या कथासंग्रहासाठी साहित्य अकादमीचे प्रतिष्ठेचे पुरस्कार (२०१६) जाहीर झाले आहेत.
या सर्वांचे महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या वतीने मनःपूर्वक अभिनंदन!



अनुक्रमणिका


राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद



स्मरण

■ राजा दीक्षित ■

**म. श्री. दीक्षित हे महाराष्ट्र साहित्य परिषदेचे अतिशय निष्ठावान कार्यकर्ते. आयुष्यभर त्यांनी निरलसपणे परिषदेची सेवा केली. मश्रींच्या त्यागाप्रति एक कृतज्ञता म्हणून त्यांच्या नावाची पायरी परिषदेत करण्यात आली आहे. एका अर्थाने मश्रींचे हे उचित स्मारकच आहे. या निमित्ताने मश्रींचे चिरंजीव आणि इतिहासाचे ज्येष्ठ अभ्यासक असलेल्या प्रा. राजा दीक्षित यांनी व्यक्त केलेल्या भावना.**

# मश्रींची पायरी...



म. श्री. दीक्षित (१६ मे १९२४-१६ फेब्रुवारी २०१४) शर्ट-पायजमा-जाकीट अशा साध्या वेशातला हा साधा माणूस सुमारे ६७ वर्षे महाराष्ट्र साहित्य परिषदेशी संबंधित होता. 'निरलस कार्यकर्त्यांचे मोहोळ' असे पुण्याचे वर्णन गांधीजींनी केले आहे; मश्री हे त्यातीलच एक मधुकर! १ एप्रिल १९४७ या दिवशी 'बापूसाहेब माटे यांचे बोट धरून' मश्री खऱ्या अर्थाने परिषदेची पायरी चढले. मिलिटरी अकाउंट्समधील अधिक पगाराची नोकरी सोडून परिषदेत कारकुनी पत्करण्याचा 'अव्यवहारीपणा' त्यांनी खुषीने पत्करला. सुमारे २५ वर्षे ही नोकरी करून पुढे ते कार्यवाह, कोषाध्यक्ष आणि विश्वस्त या नात्यांनी परिषदेची सेवा करत राहिले. या जबाबदाऱ्या संपल्यावरसुद्धा मृत्यू-समीप अवस्थेपर्यंत अगदी काठी टेकत का होईना, मश्री नावाचे चैतन्य परिषदेच्या पायरीशी येत राहिले. त्यांच्या या दुर्मिळ सेवाभावाचा कृतज्ञ गौरव मसापच्या ११०व्या वर्धापनदिनी करण्यात आला. प्रा. मिलिंद जोशी यांच्या नेतृत्वाखालील नव्या कार्यकारी मंडळाने परिवर्तनशील धोरण आखून उत्साहाने जे कार्य आरंभले आहे त्यातील हा एक कल्पक उपक्रम. परिषदेच्या कार्यालयाच्या पायरीचे 'मश्रींची पायरी' असे नामकरण २७ मे २०१६ रोजी करण्यात आले. मश्रींचे याहून उचित स्मारक अन्य कोणतेही होऊ शकले नसते. गेल्या पस्तीस वर्षांपासून आजीव सदस्य असलेला परिषदेचा एक हितचिंतक आणि मश्रींचा मुलगा या दुहेरी नात्याने या कल्पकतेला मी मनापासून दाद देतो. माझ्या वडिलांच्या मोठेपणाचा अभिमान मला नाही असे नाही, पण त्यांच्या 'लहान'पणाचा अभिमान त्याहून अधिक आहे. 'तुका म्हणे बरवे जाण। व्हावे लहानाहुनि लहान ।।' या उक्तीमध्ये त्यांच्या सेवाभावी आयुष्याचे मर्म साठवलेले आहे. पायरीच्या नामकरणाचे अप्रूप वाटते ते त्यामुळेच.

साहित्यिक व चरित्रकार म्हणून मश्री ज्ञात आहेतच. 'मसाप'चा इतिहास त्यांनी लिहिलेला आहे. पण त्यांच्या साहित्यिक कामगिरीच्या परामर्शाला या छोट्या लेखात जागा नाही. 'पायरी'च्या संदर्भात लिहिताना त्यांचे संस्थापटुत्व मला मोलाचे वाटते. सुमारे सहा दशके पुण्यातील अनेक सार्वजनिक संस्थांशी आणि उपक्रमांशी ते जोडलेले होते. 'पुण्याचा



अनुक्रमणिका



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद



'वडिलांच्या 'सार्वजनिक काका'पणामुळे आमचे कौटुंबिक जीवन विलक्षण पोळलेले असले, तरी त्या चटक्यांनी आम्हाला वेगळी समृद्धीसुद्धा दिलीय. काकांच्या फाटक्या खिशाच्या जाकिटातून मिळालेला सांस्कृतिक ठेवा लाखमोलाचा आहे. अर्थात त्याला आईच्या अबोल त्यागाचे अस्तर आहे.' हल्ली मोठमोठ्या देणग्या सहज मिळतात, पण मश्रींनी असंख्य छोट्या देणग्यांचा जो पैसा-फंड आयुष्यभर उभा केला त्याला 'खुलभर दुधाच्या कहाणी'तील बुधलीचे किंवा खारीच्या मदतीचे मूल्यात्मक मोल आहे. मश्रींची आयुष्यभर अनेक प्रकारे उपेक्षा झाली, अवमान झाले, पण 'मश्रींच्या पायरी'च्या रूपाने त्यांना 'काव्यगत न्याय' (Poetic justice) मिळाला असे मला वाटते.'

आणि मसापचा चालताबोलता इतिहास' म्हणून ते ओळखले जातात. म.म.दत्तो वामन पोतदार, प्रा.श्री.म. तथा बापूसाहेब माटे आणि जयंतराव टिळक यांच्यासह आणि त्यांच्या प्रेरणेने ते विधायक सार्वजनिक कार्य करत राहिले. एरवी ते हिंदुत्वनिष्ठ आणि स्वजातीचे अभिमानी, पण सार्वजनिक कार्यात त्यांची दृष्टी समावेशक होती. या बाबतीत जात, धर्म, लिंग, राजकीय पक्ष यांचे भेद त्यांनी मानले नाहीत. 'साहित्य परिषद ही सदाशिवपेठी ब्राह्मणांपुरती मर्यादित राहता कामा नये', असे ते म्हणत असत आणि त्याला पूरक असे वागतही असत. याची नुसती उदाहरणे सांगायची तर एक वेगळा लेख लिहावा लागेल! परोपकार हा त्यांचा स्वाभाविक धर्म होता आणि त्या माध्यमातून अनेक माणसे त्यांनी संस्थांशी जोडली. संस्था चालवायच्या म्हणजे थोडेफार राजकारण करावे लागते आणि मश्रींनीही ते केले! पण त्याचा उद्देश मात्र संस्थाहित हाच असायचा. स्वहिताचा विचार करणारी 'कुरणसंस्कृती' त्यांनी कधी जोपासली नाही. संस्थांसाठी वणवण भटकत पै पै गोळा करताना मी त्यांना पाहत आलो. अनेकदा ते माझ्या आईला सांगायचे, "अगं, आज तो अमुक-तमुक आपल्याकडे येणार आहे. चांगला शिरा किंवा पोहे आणि फक्कड चहा कर. मी त्याच्याकडून पैसे उकळणार आहे!" हे पैसे उकळणे म्हणजे साहित्य परिषदेसाठी देणगी वा आजीव वर्गणी मिळवणे, बरं का! त्यांची स्वतःची सांपत्तिक स्थिती मात्र अशी होती, की पाहुण्यांसाठीचे हे पोहे म्हणजे 'सुदाम्याचे पोहे'च होते! बरं, ते एका कृष्णाला नव्हे, तर अनेकांना दिले जात. एखाद्या सार्वजनिक कार्यकर्त्याच्या फकिरी वृत्तीमुळे त्याचे घर किती पोळते हे आम्ही साक्षात अनुभवले आहे. 'इतिहास, समाजविचार आणि केशवसुत' हा प्रबंध आई-वडिलांना अर्पण करताना मी लिहिले होते, की 'वडिलांच्या 'सार्वजनिक काका'पणामुळे आमचे कौटुंबिक जीवन विलक्षण पोळलेले असले, तरी त्या चटक्यांनी आम्हाला वेगळी समृद्धीसुद्धा दिलीय. काकांच्या फाटक्या खिशाच्या जाकिटातून मिळालेला सांस्कृतिक ठेवा लाखमोलाचा आहे. अर्थात त्याला आईच्या अबोल त्यागाचे अस्तर आहे.' हल्ली मोठमोठ्या देणग्या सहज मिळतात, पण मश्रींनी असंख्य छोट्या देणग्यांचा जो पैसा-फंड आयुष्यभर उभा केला त्याला 'खुलभर दुधाच्या कहाणी'तील बुधलीचे किंवा खारीच्या मदतीचे मूल्यात्मक मोल आहे. मश्रींची आयुष्यभर अनेक प्रकारे उपेक्षा झाली, अवमान झाले, पण 'मश्रींच्या पायरी'च्या रूपाने त्यांना 'काव्यगत न्याय' (Poetic justice) मिळाला असे मला वाटते. 'ही माझी नामदेवाची पायरी आहे,' असे ते म्हणत असत. पंढरपूरच्या विठ्ठल मंदिराच्या महाद्वारी तळाच्या पायरीशी नामदेवांची समाधी आहे. संतांच्या व भक्तांच्या चरणीची धूळ सदैव आपल्या मस्तकी लागावी, ही नामदेव महाराजांची उदात्त भावना होती. ती त्यांच्या अभंगामध्येही व्यक्त झाली आहे. साहित्य परिषदेसंदर्भात मश्रींच्या मनी अशीच भावना होती. त्यांच्या मृत्यूनंतर परिषदेच्या पायरीवर त्यांना ठेवण्याची इच्छा परिषदेच्या पदाधिकाऱ्यांच्या औदार्यामुळे पूर्ण झाली. परिषद हाच मश्रींचा विठ्ठल होता, आणि एका अर्थी या विठ्ठलाच्या पायाशी त्याचा नामदेव विसावला, समाधिस्थ झाला. अधिकारपदे असोत वा नसोत, एक सच्चा कार्यकर्ता म्हणून मश्री जन्मभर (आणि मृत्यूनंतरही!) आपली पायरी ओळखून वागले. म्हणूनच 'मश्रींची पायरी' हे त्यांचे स्मारक अत्यंत औचित्यपूर्ण आहे. याबाबत नामदेवपुत्र गोंदा यांचा अभंग उद्धृत करूनच मी माझ्या भावना व्यक्त करतो-

*'आवडला नामा देवा विठ्ठलासी।*
*ठेवा चरणांपाशी अखंडित ।।*
*नामयाची कुडी घातली पायरी।*
*येता जाता हरी पाय देती ।।*
*आणिकही पाय देती साधुसंत।*
*ऐसा पूर्ण भक्त उद्धरिला ।।'*

●

**प्रा.राजा दीक्षित**
चलभाष : ९७६७७८९५४
smrajadixit@gmail.com



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

# 'महाराष्ट्र साहित्य पत्रिके'मधील साहित्यविचार व साहित्यसमीक्षा



**महाराष्ट्र साहित्य परिषदेचे मुखपत्र असलेल्या 'महाराष्ट्र साहित्य पत्रिका' या नियतकालिकाला शंभर वर्षांची दीर्घ वाङ्मयीन परंपरा आहे. मराठी भाषा साहित्य, समीक्षा आणि संशोधन या विषयांच्या अनुषंगाने विपुल लेखन पत्रिकेत आजवर प्रसिद्ध होत आले आहे. 'महाराष्ट्र साहित्य पत्रिके'मधील २००० सालापर्यंतच्या समीक्षा विचाराचा व साहित्य विचाराचा थोडक्यात आढावा घेणारा निबंध.**



एखाद्या वाङ्मयीन नियतकालिकामध्ये प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष स्वरूपात व्यक्त झालेला साहित्यविचार व प्रकाशित झालेली साहित्यसमीक्षा ह्या गोष्टी एकूण साहित्यव्यवहाराला पूरक आणि पोषक ठरू शकतात, दिशा वा वळण देऊ शकतात, तसेच गतीही देऊ शकतात. म्हणून त्या जाणून घेणे साहित्यव्यवहाराच्या दृष्टीने आवश्यक ठरते. मराठी भाषेमध्ये नियतकालिकांची, विशेषतः वाङ्मयीन नियतकालिकांची दीर्घ आणि उज्ज्वल अशी परंपरा आहे. पुणे येथील महाराष्ट्र साहित्य परिषदेचे मुखपत्र असलेले 'महाराष्ट्र साहित्य पत्रिका' हे नियतकालिक मराठी भाषेतील एक महत्त्वाचे वाङ्मयीन नियतकालिक म्हणून मान्यता पावलेले आहे. ह्या नियतकालिकामधून इ. स. २००० पर्यंत, विशेषतः इ. स. १९८० पर्यंत व्यक्त झालेला साहित्यविचार व प्रकाशित झालेली साहित्यसमीक्षा ह्या दोन गोष्टी येथे आपल्याला जाणून घ्यावयाच्या आहेत.

**महाराष्ट्र साहित्य परिषद आणि महाराष्ट्र साहित्य पत्रिका :**

मराठी भाषेतील साहित्यव्यवहाराला व्यासपीठ उपलब्ध करून देणाऱ्या अनेक छोट्यामोठ्या साहित्यसंस्था महाराष्ट्रात आणि महाराष्ट्राबाहेर कार्य करताना दिसतात. पुणे येथील 'महाराष्ट्र साहित्य परिषद' ही त्यापैकी एक साहित्यसंस्था होय. ह्या साहित्यसंस्थेची स्थापना पुणे येथे २७ मे १९०६ रोजी करण्यात आली. शंभराहून अधिक वर्षांची वाटचाल केलेल्या ह्या साहित्यसंस्थेने मराठी भाषेच्या आणि साहित्याच्या संवर्धनासाठी मोलाची कामगिरी बजावली आहे. ही साहित्यसंस्था एकूण मराठी साहित्यसंस्थांमध्ये ज्येष्ठ आणि प्रतिष्ठित मानली जाते.

अशा ह्या महाराष्ट्र साहित्य परिषदेने आपले मुखपत्र म्हणून 'महाराष्ट्र साहित्य पत्रिका' हे वाङ्मयीन नियतकालिक ऑगस्ट १९१३ पासून सुरू केले. प्रारंभीची दोन वर्षे ते 'विविधज्ञानविस्तार' ह्या मासिकाला जोडून मासिक स्वरूपात निघत होते. नंतर इ. स. १९१६ ते १९२५ ह्या कालावधीत ते त्रैमासिक स्वरूपात निघत होते. पुढे मे १९२५ ते फेब्रु. १९२८ ह्या कालावधीत काही कारणांमुळे हे नियतकालिक प्रकाशित होऊ शकले नाही. २२ मार्च १९२८ पासून मात्र ते 'विविधज्ञानविस्तार'ची पुरवणी म्हणून नव्हे, तर स्वतंत्र रूपात परत निघू लागले. तेव्हापासून आजतागायत



अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

त्याची वाटचाल अखंडपणे चालू आहे. ह्या दीर्घ वाटचालीमध्ये ह्या नियतकालिकाने साहित्य, समीक्षा आणि संशोधन ह्या तिन्ही क्षेत्रांशी संबंधित लेखनास प्रसिद्धी दिली आहे. ह्या लेखनामधून कविता, लेख, ग्रंथपरीक्षणे, वार्षिक वाङ्मय समालोचने, वाङ्मयेतिहास, समीक्षा, वाङ्मयसंशोधन, भाषा, व्याकरण असे अनेक विषय हाताळण्यात आले आहेत. ह्या नियतकालिकाचे संपादक म्हणून वेगवेगळ्या काळांत ना. गो. चापेकर, दत्तो वामन पोतदार, माधवराव पटवर्धन (माधव ज्युलियन), मो. ज्ञा. शहाणे, के. नारायण काळे, रा. श्री. जोग, श्री. म. माटे, य. दि. पेंढरकर (कवी यशवंत), रा. शं. वाळिंबे, वि. भि. कोलते, वा. रा. ढवळे, दि. के. बेडेकर, श्री. के. क्षीरसागर, स. गं. मालशे, भालचंद्र फडके, हे. वि. इनामदार, आनंद यादव, भीमराव कुलकर्णी, वसंत स. जोशी, शंकर सारडा, वि. स. वाळिंबे, ह. ल. निपुणगे, अ. वा. कुलकर्णी, गं. ना. जोगळेकर, सु. प्र. कुलकर्णी ह्या व्यक्तींनी काम पाहिले आहे.

**'महाराष्ट्र साहित्य पत्रिके'मधील साहित्यविचार :**

आपल्याकडील साहित्यविचार हा मूळचा खास मराठी असा नाही. तो संस्कृत साहित्यशास्त्राच्या आधारे करण्यात आलेला असून शिवाय त्याचे प्रमाणही अल्प आहे. एकोणिसाव्या शतकामध्ये जसे आपल्याकडे आधुनिक मराठी साहित्य अवतरले, तसेच इंग्रजीतील साहित्यविचार आत्मसात करून त्याचे मराठी रूपही अवतरले. इ. स. १९१३ ते २००० ह्या काळात 'महाराष्ट्र साहित्य पत्रिके'त साहित्यविचार व्यक्त करणारे अनेक लेख प्रकाशित झाले. 'वैचित्र्य हाच काव्याचा आत्मा', 'पुरोगामी वाङ्मयाची लक्षणे', 'बा. सी. मर्ढेकर यांच्या Arts and Man या ग्रंथाची भाषांतरित प्रकरणे', 'स्थायीभाव म्हणजे सेंटिमेंट की इन्स्टिंक्ट?', 'वाङ्मयीन टीकेची उद्दिष्टे', 'कलावाद', 'टीका : काल, आज आणि उद्या', 'वाङ्मयीन समीक्षेची परिभाषा', 'वाङ्मयविद्या : स्वरूप व व्याप्ती', 'सौंदर्यवस्तूचे संघटन', 'भाषा आणि साहित्य', 'कोल्हटकरांचा रसविचार', 'साहित्यसमीक्षा आणि भाषाविज्ञान : एक संकलन', 'सर्जनक्षम कल्पनाशक्ती : एक टिपण', 'तांबे यांची कलाविषयक भूमिका', 'मराठी समीक्षेतील सिद्धांतविचार', 'मराठी नवअभिजातवाद', 'मर्ढेकर : साहित्यातील सौंदर्य', 'सामान्य भाषा, समीक्षा आणि मूल्यांकन', 'शैली आणि शैलीतील आधुनिकता', 'समीक्षेची निर्मिती' हे त्यातील काही लेख होत. ह्या लेखांच्या रूपाने 'महाराष्ट्र साहित्य पत्रिके'ने एकूण मराठी साहित्यविचारात मोलाची भर टाकली आहे. ह्या लेखांविषयीचा अधिक तपशील पुढीलप्रमाणे : 'वैचित्र्य हाच काव्याचा आत्मा' - श्रीपाद कृष्ण कोल्हटकर, वा. गो. आपटे ह्यांचे दोन अनुवादात्मक लेख (सप्टें.-नोव्हें.-१९१३), 'पुरोगामी वाङ्मयाची लक्षणे' पहिले टिपण- पु. य.देशपांडे, दुसरे टिपण- द. वा. पोतदार (अंक ४१, फेब्रु. १९३८), 'बा. सी. मर्ढेकर यांच्या Arts and Man या ग्रंथाची भाषांतरित प्रकरणे', अनुवादक- रा. भि. जोशी (ऑक्टो. १९४० ), 'स्थायीभाव म्हणजे सेंटिमेंट की इन्स्टिंक्ट?', (वर्ष १६, अंक ६८ , ऑक्टो. १९४३ ), 'वाङ्मयीन टीकेची उद्दिष्टे'- म. गो. भाटे (अंक ७४, जून १९४५), 'कलावाद'- म. गो. भाटे (अंक ७५, जुलै१९४५), 'टीका : काल, आज आणि उद्या'- वा. ल. कुलकर्णी (अंक १८०, जाने.-मार्च १९५२), 'वाङ्मयसमीक्षेची परिभाषा' -मा. गो. देशमुख (अंक १०८), 'वाङ्मयविद्या : स्वरूप व व्याप्ती'- मु. ग. पानसे (अंक १७१-१७२, ऑक्टो. १९६९-मार्च १९७०), 'सौंदर्यवस्तूचे संघटन'- संभाजी कदम (अंक १७१-१७२, ऑक्टो. १९६९-मार्च१९७०), 'भाषा आणि साहित्य'- अशोक रा. केळकर (अंक १७१-१७२, ऑक्टो. १९६९-मार्च १९७०), 'कोल्हटकरांचा रसविचार'- भास्कर गिरधारी (अंक १७८, जुलै-सप्टें. १९७१), 'साहित्यसमीक्षा आणि भाषाविज्ञानः एक संकलन'- ना. ग. जोशी (अंक १७८, जुलै-सप्टें. १९७१), 'सर्जनक्षम कल्पनाशक्ती : एक टिपण'- प्रभाकर मांडे (अंक १८५, एप्रिल-जून १९७३), 'तांबे यांची कलाविषयक भूमिका' -रा. शं. वाळिंबे (अंक १८७ - १८८, ऑक्टो. १९७३ मार्च १९७३-१९७४), 'मराठी समीक्षेतील सिद्धांतविचार' -विलास खोले (अंक १९९ ऑक्टो.- नोव्हें.-डिसें.- १९७६), 'मराठी नवअभिजातवाद'-अनिरुद्ध अनंत कुलकर्णी (अंक २०६-२०७, जुलै -डिसें. १९७८), 'मर्ढेकर : साहित्यातील सौंदर्य'- म. द. हातकणंगलेकर (अंक १७१-१७२, ऑक्टो. १९६९-मार्च १९७०), 'सामान्य भाषा, समीक्षा आणि मूल्यांकन'- सुरेंद्र बारलिंगे (अंक १८५, एप्रिल-जून १९७३), 'शैली आणि शैलीतील आधुनिकता'- स. शि. भावे (अंक २१०, जुलै-सप्टें. १९७९), 'समीक्षेची निर्मिती'- द. भि. कुलकर्णी (अंक २१०, जुलै-सप्टें. १९७९).

वरील लेखांमधून साहित्यविचाराशी संबंधित अशा अनेक छोट्यामोठ्या बाबींवर अधिकारी व्यक्तींनी प्रकाश टाकलेला आढळतो. उदाहरणांनी सांगावयाचे, तर 'पुरोगामी वाङ्मयाची लक्षणे' ह्या लेखात पु. य. देशपांडे ह्यांनी पुरोगामी वाङ्मयाविषयीचे विचार मांडले आहेत. ते



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

म्हणतात, 'समाजातील संघर्षाच्या मुळाशी जे सत्य असते, त्याच्याशी समरस होऊन जी वाङ्मयनिर्मिती होते, ते वाङ्मय पुरोगामी ठरते.'१ म. गो. भाटे ह्यांचे 'कलावाद' आणि 'वाङ्मयीन टीकेची उद्दिष्टे' हे दोन लेख महत्त्वाचे आहेत. त्यांनी विशिष्ट साहित्यकृतींविषयीच्या गुणदोषांची चिकित्सा करणे, तिचा वाच्यार्थ व लक्षार्थ स्पष्ट करणे, तिचे सहृदयतेने रसग्रहण करणे, तिचे वर्गीकरण करणे, मूल्यमापन करणे, ही वाङ्मयीन टीकेची उद्दिष्टे सांगितली आहेत.२ मु. ग. पानसे ह्यांनी 'वाङ्मयविद्या (Philology) : स्वरूप व व्याप्ती' ह्या आपल्या लेखामध्ये फिलॉलॉजी आणि लिंग्विस्टिक्स हे दोन्ही एक असल्याचे स्पष्ट केले आहे.३ अशोक केळकर ह्यांनी 'भाषा आणि साहित्य' ह्या आपल्या लेखामध्ये दोहोंचा संबंध उलगडून दाखवला आहे. त्यांच्या मते 'भाषा हे साहित्याचे कलाद्रव्य आहे. शैली म्हणजे सेहतुक भाषासरणी.'४ विलास खोले ह्यांचा 'मराठी समीक्षेतील सिद्धांतविचार' हा एक महत्त्वाचा लेख 'पत्रिके'मध्ये आढळतो. ह्या लेखामध्ये खोले ह्यांनी मर्ढेकरांच्या आणि मर्ढेकरांच्या नंतरच्या कालखंडात जो सिद्धांतविचार पुढे आला त्याचा धांडोळा घेतला आहे. खोले ह्यांनी आपल्या ह्या लेखामधून काही महत्त्वाचे प्रश्नही उपस्थित केले आहेत. एके ठिकाणी ते लेखात म्हणतात, 'साहित्याच्या सर्वांगीण रूपाचा- मग ते काव्य असो, नाटक असो, कथा असो वा कादंबरी असो, त्याचे मूलतत्त्व कोणते, त्याला विशिष्ट रूपच का प्राप्त होते, त्याची यशस्विता कोणत्या निकषांनी ठरवता येईल, असे अनेक प्रश्न उत्पन्न होत असले, तरी त्यांची उत्तरे मराठी साहित्यविचारात मिळू शकत नाहीत.'५ 'मराठी नवअभिजातवाद' हा अनिरुद्ध अनंत कुलकर्णी ह्यांचा एक महत्त्वाचा लेख 'पत्रिके'मध्ये पाहावयास मिळतो.६ 'मर्ढेकर : साहित्यातील सौंदर्य' ह्या लेखामध्ये म. द. हातकणंगलेकर ह्यांनी मर्ढेकरांच्या सौंदर्यविचाराचा परामर्श घेतला आहे.७ मर्ढेकरांनी लयतत्त्वावर आधारलेला जो सिद्धांत मांडला, त्याचे उपयोजन कसे करता येईल त्याचे दिग्दर्शन त्यांनी आपल्या लेखांतून फार कमी केले. असा मोठ्या प्रमाणावर प्रयत्न त्यांनी केला असता तर आपल्या सिद्धांताच्या मर्यादा त्यांच्या ध्यानात आल्या असत्या, हे हातकणंगलेकरांचे ह्या संदर्भातील निरीक्षण योग्यच म्हणावे लागेल. सुरेंद्र बारलिंगे ह्यांनी 'सामान्य भाषा, समीक्षा आणि मूल्यांकन' ह्या आपल्या लेखामध्ये संकल्पनांची चर्चा करीत आपले विचार विशद केले आहेत. अनेक कारणांमुळे समीक्षेची भाषा ही कोणती तरी खास भाषा असते, असा आग्रह न धरता सर्वसामान्य भाषा हीच समीक्षेची भाषा असते, असे समजणे आवश्यक आणि योग्य आहे, असे




**(समीक्षकाच्या) समोर जीवनवाद, कलावाद, अलौकिकवाद, आकृतिवाद, परंपरा, संप्रदाय, पंथ, व्यक्तिदर्शन, कथानक, भाषाशैली, प्रचार, पुरोगामित्व, पलायनवाद असा कुठलाही सुटा आणि स्वतंत्र प्रश्न नसतो. त्या कलाकृतीने जी आस्वादावस्था निर्माण केलेली असते, त्या आस्वादावस्थेने जे प्रश्न निर्माण केलेली असतात, तेच त्याचे त्या वेळचे प्रश्न असतात. कधी हे प्रश्न तंत्राचे असतात, कधी हे प्रश्न जीवनमूल्याचे, कधी पुरोगामित्वाचे, कधी भाषेचे, हे त्या कलाकृतीवर अवलंबून असते.'**
**द. भि. कुलकर्णी**

त्यांनी आपले मत नोंदविले आहे.८ द. भि. कुलकर्णी ह्यांनी 'समीक्षेची निर्मिती' ह्या आपल्या लेखामध्ये काही महत्त्वाचे मुद्दे उपस्थित केले आहेत. ते एके ठिकाणी म्हणतात, 'त्याच्या (समीक्षकाच्या) समोर जीवनवाद, कलावाद, अलौकिकवाद, आकृतिवाद, परंपरा, संप्रदाय, पंथ, व्यक्तिदर्शन, कथानक, भाषाशैली, प्रचार, पुरोगामित्व, पलायनवाद असा कुठलाही सुटा आणि स्वतंत्र प्रश्न नसतो. त्या कलाकृतीने जी आस्वादावस्था निर्माण केलेली असते, त्या आस्वादावस्थेने जे प्रश्न निर्माण केलेली असतात, तेच त्याचे त्या वेळचे प्रश्न असतात. कधी हे प्रश्न तंत्राचे असतात, कधी हे प्रश्न जीवनमूल्याचे, कधी पुरोगामित्वाचे, कधी भाषेचे, हे त्या कलाकृतीवर अवलंबून असते.'९

'महाराष्ट्र साहित्य पत्रिके'च्या काही अंकांमधून साहित्यविचाराशी संबंधित अशा ग्रंथांवर परीक्षणे आलेली आहेत.१० त्या परीक्षणपर लेखांचा तपशील कालानुक्रमे पुढीलप्रमाणे : 'अभिनव काव्यप्रकाश'- ना. गो. चापेकर (वर्ष ४, अंक १ व २, मार्च - जून १९३१), 'वाङ्मयीन महात्मता' - बा. सी. मर्ढेकर (वर्ष १४, अंक ५९, जुलै- सप्टें. १९३९), 'पद्यमीमांसा'-वि. ज. सहस्रबुद्धे (वर्ष १४, अंक ६०, ऑक्टो.-डिसें. १९४१), 'पुरोगामी साहित्य' -



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

रा. श्री. जोग (वर्ष १५, अंक ६१, जाने. १९४२), 'मराठीचे साहित्यशास्त्र'- रा. श्री. जोग (वर्ष १५, अंक ६२, एप्रिल १९४२), 'रसविमर्श'- रा. श्री. जोग (वर्ष १६, अंक ६५, जाने. १९४३), 'कलेची क्षितिजे'- श्री. के. क्षीरसागर (वर्ष १६, अंक ६६, एप्रिल १९४३), 'लघुकथा कशा लिहाव्या'-के. नारायण काळे (वर्ष १६, अंक ६७, जुलै १९४३), 'साहित्याचा ध्रुवतारा'- रा. श्री. जोग (वर्ष १८, अंक ७५, जुलै-सप्टें. १९४५), 'जीवन आणि साहित्य'- द. के. केळकर (वर्ष १८, अंक ७६, ऑक्टो.-डिसें. १९४५), 'मराठी कवितेचे अध्यापन'- गं. भा. निरंतर (वर्ष १८, अंक ७६, ऑक्टो. -डिसें. १९४५), 'ध्वनिसिद्धांत'- शांताराम जोग( अंक १९२, जाने.- मार्च १९७५), 'प्राचीन काव्यशास्त्र'- उषा माधव देशमुख (अंक १९५-१९६, ऑक्टो. १९७५- मार्च १९७६), 'सृष्टी, सौंदर्य आणि साहित्यमूल्य'- प्र. ना. परांजपे (अंक २११, ऑक्टो.-डिसें. १९६९), 'पाश्चात्त्य साहित्यशास्त्र'- अशोक केळकर (अंक २५३, एप्रिल-जून १९९०), 'साहित्यविचाराचा प्राथमिक परिचय'- नीलिमा गुंडी (अंक २७१, ऑक्टो.- डिसें. १९९४).

वरील तपशिलावरून हे स्पष्ट होते, की 'महाराष्ट्र साहित्य पत्रिके'च्या प्रदीर्घ वाटचालीमध्ये साहित्यविचाराशी संबंधित अशी पुस्तके मराठीत अल्प प्रमाणातच प्रकाशित झाली असावीत. शिवाय त्यांच्याशी संबंधित ग्रंथपरीक्षणेही वर तपशील दिल्याप्रमाणे केवळ पंधराच 'महाराष्ट्र साहित्य पत्रिकेमध्ये आलेली आढळतात. ह्या ग्रंथपरीक्षणांमधून हे स्पष्ट होते, की संस्कृत काव्यशास्त्राबरोबर पाश्चात्त्य साहित्यशास्त्रही मराठी साहित्यजगत जाणून घेताना दिसते. मा. गो. देशमुख ह्यांनी सिद्ध केलेल्या 'मराठीचे साहित्यशास्त्र' (ज्ञानेश्वर ते रामदास) ह्या आगळ्यावेगळ्या ग्रंथाचे स्वागत रा. श्री. जोग ह्यांनी परीक्षण लिहून केलेले आढळते. साहित्यविचाराशी संबंधित अशा ग्रंथांवरील ह्या परीक्षणांमधून कळत-नकळत भारतीय आणि पाश्चात्त्य साहित्यविचार वाचकांसमोर येऊ शकला. तसेच मराठीचे स्वतःचे असे स्वतंत्र साहित्यशास्त्र मांडण्याच्या मा. गो. देशमुखांच्या अभिनव प्रयत्नावरही चर्चा आणि चिंतन व्यक्त होऊ शकले.

**'महाराष्ट्र साहित्य पत्रिके'मधील साहित्यसमीक्षा:**

'महाराष्ट्र साहित्य पत्रिके'च्या विविध अंकांमधून वरीलप्रमाणे तात्त्विक पातळीवरील साहित्यविचार प्रकाशित झालेला आढळतो. त्याचबरोबर स्फुट वा दीर्घ लेखांच्या स्वरूपात, तसेच ग्रंथपरीक्षणांच्या स्वरूपात साहित्यसमीक्षाही प्रकाशित झालेली आढळते. तिचा आता एकत्रित परामर्श घेऊ. 'महाराष्ट्र साहित्य पत्रिके'च्या विविध अंकांमध्ये काही कवींविषयी आणि कवितांविषयी लेख प्रकाशित झालेले आढळतात. स्वातंत्र्यवीर सावरकर, केशवसुत, माधव जूलियन, बा. सी. मर्ढेकर, भा. रा. तांबे, गोविंद, वसंत बापट ह्या कवींचा त्यात अंतर्भाव होतो. ह्या कवींविषयी आणि त्यांच्या कवितेविषयी प्रकाशित झालेल्या लेखांनी एकूण मराठी काव्यविचारामध्ये मोलाची भर टाकली आहे. ऑक्टो.-डिसें. १९६५ च्या अंकामध्ये के. ना. वाटवे ह्यांचा 'मृत्युंजय महाकवी' हा स्वातंत्र्यवीर सावरकरांवरील मृत्युलेख प्रकाशित झाला.११ ह्या लेखामधून वाटवे ह्यांनी सावरकारांच्या कवित्वाचे विशेष विशद केले आहेत. सावरकरांचे कवित्व महाकवीच्या कसाचे असल्याचे वाटवे ह्यांनी नमूद केले आहे. केशवसुतांवर 'पत्रिके'मध्ये दोन लेख आढळतात. 'केशवसुतांनी केलेल्या क्रांतीचे आकलन झाले आहे काय?'१२ हा श्री. के. क्षीरसागर ह्यांचा लेख, तसेच 'केशवसुतांच्या कवितेचे अन्तःस्वरूप'१३ हा भ. श्री. पंडितांचा लेख हे ते दोन लेख होत. पैकी पहिल्या लेखामध्ये श्री. के. क्षीरसागरांनी केशवसुतांनी मराठी काव्यात जी क्रांती केली तिच्याबद्दल साधकबाधक चर्चा केली आहे. 'तुतारी' वळणाच्या सामाजिक कविता लिहिणे, कवितेची शैली, वृत्त आणि काव्यप्रकार ह्यांच्यामध्ये जाणीवपूर्वक बदल करणे, तसेच वेगळे काव्यविषय, विशेषतः आत्मपर काव्यविषय हाताळणे, अशी विविध क्रांती केशवसुतांनी केल्याचे श्री. के. क्षीरसागर स्पष्ट करतात. भ. श्री. पंडित ह्यांनी 'केशवसुतांच्या कवितेचे अन्तःस्वरूप' ह्या आपल्या लेखामध्ये केशवसुतांच्या पूर्ववर्ती कवींपैकी पुष्कळांच्या लक्षात नादाचे महत्त्व आले नाही, असे म्हटले आहे. नाद आणि अर्थ ह्यांचा समन्वय हवा, हे सत्य केशवसुत आणि त्यांचे समकालीन कवी ह्यांनी प्रथम ओळखले, अशीही त्यांनी पुढे पुस्ती जोडली आहे. भा. रा. तांबे ह्यांच्यावर पत्रिकेमध्ये एकूण ६ लेख प्रकाशित झाले आहेत. त्यांची शीर्षके आणि त्यांचे लेखक पुढीलप्रमाणे : १. 'तांब्यांच्या गीतिकाव्याचे बाह्यान्तर स्वरूप' - भ. श्री. पंडित१४, २. 'तांबे यांची गीतिकाव्ये : काही विचार'- रमेश तेंडुलकर१५, ३. 'आनंदयात्री तांबे'- वि. स. खांडेकर१६, ४. 'रोमँटिक प्रेम आणि कविवर्य तांबे' - श्री. के. क्षीरसागर१७, ५. 'तांबे : व्यक्ती आणि काव्य' - रा. अ. काळेले१८, ६. 'माझ्या दृष्टिकोणातून तांबे' - गोविंद झोकरकर१९. ह्या सर्व लेखांमधून तांब्यांचे केशवसुतांहून वेगळे असलेले महत्त्व अधोरेखित करण्यात आले आहे. तांबे हे आधुनिक होते, भारतीयही होते आणि ईश्वरनिष्ठसुद्धा होते, हे श्री. के. क्षीरसागरांसारख्या मर्मज्ञ समीक्षकाने स्पष्ट



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

केले आहे. तांब्यांनी शब्दांना सूर दिला; कवितेला चित्र, संगीत, नाट्य ह्या कलांची जोड मिळवून दिली. तसेच तांब्यांनी 'नाट्यगीत' हा नवा काव्यप्रकार मराठी कवितेला प्रदान केला. मर्ढेकरांवर 'पत्रिके'मध्ये दोन लेख प्रकाशित झालेले आढळतात. ते पुढीलप्रमाणे : १.'मर्ढेकर आणि दुर्बोधता' - रा. अ. काळेले२० व २. 'मर्ढेकरांची प्रतिमासृष्टी' -निशिकांत मिरजकर२१. ह्या दोन लेखांमध्ये मर्ढेकरांच्या प्रतिमांबाबत दोन विरोधी दृष्टिकोन व्यक्त झालेले दिसतात. काळेले ह्यांनी मर्ढेकरांची कविता नवीन प्रतिमांमुळे दुर्बोध झाल्याची तक्रार केली आहे, तर मिरजकरांनी मर्ढेकरांच्या नवीन प्रतिमांसाठी मर्ढेकरांना श्रेय बहाल केले आहे. ह्यातून मराठी काव्यसृष्टीमध्ये मर्ढेकर आणि तत्सम नवकवींविषयी कशी मतमतांतरे व्यक्त होत होती ते लक्षात येते. बलवंत देशमुख ह्यांचा 'आजची मराठी लावणी' हा एक महत्त्वाचा लेख 'पत्रिके'मध्ये पाहावयास मिळतो२२. ह्या लेखामध्ये देशमुखांनी ग. दि. माडगूळकर, बोरकर, अमरशेख, वसंत बापट, जगदीश खेबुडकर, शांता शेळके हे आजचे मराठी लावणीकार होत, हे स्पष्ट करून त्यांचे वेगळेपण नेमकेपणाने विशद केले आहे.

गं. ना. जोगळेकर, म. ना. अदवंत, भालचंद्र फडके, सुरेश जोशी, वि. वा. शिरवाडकर (कुसुमाग्रज), सुधाकर के. भोसले, उषा मा. देशमुख, शकुंतला जोग, वसंत वऱ्हाडपांडे, अंजली सोमण, सदा कऱ्हाडे, द. ता. भोसले अशा अनेक मान्यवर व्यक्तींनी 'कथा' ह्या साहित्यप्रकाराबद्दल 'महाराष्ट्र साहित्य पत्रिके'त लेख लिहून विचार मांडले आहेत. इ. स. १९६५ नंतर कथेबद्दलचा जास्त विचार 'पत्रिके'मधून व्यक्त होत गेलेला दिसतो. ह्या कथाविचारामधून मराठी लघुकथेच्या जनकत्वाबाबत, तसेच ना. सी. फडके ह्यांच्या लघुकथालेखन तंत्राबाबत उलटसुलट ऊहापोह झालेला दिसतो. मराठी कथेचे स्वरूप, तिची वाटचाल, तिची उंची, खोली आणि विस्तार अशा मुद्द्यांचीही चर्चा ह्या कथाविचारातून झालेली दिसते. पैकी म. ना. अदवंत ह्यांच्या 'दिवाकर कृष्णांची कथा' हा लेख महत्त्वाचा आहे.२३ ह्या लेखामधून अदवंतांनी दिवाकर कृष्णांनी मराठी कथेला वेगळे वळण लावले म्हणजे काय केले ते स्पष्ट केले आहे. वि. वा. शिरवाडकर (कुसुमाग्रज) ह्यांचा 'कॅ. लिमये : आधुनिक मराठी कथेचे जनक' हाही लेख महत्त्वाचा आहे.२४ ह्या लेखामध्ये कॅ. लिमये ह्यांच्या इ. स. १९१२ ते १९२९ ह्या काळात लिहिलेल्या कथा ह्या जाणिवा, तंत्र, प्रयोगशीलता ह्या दृष्टीने ५० वर्षे पुढे जाणाऱ्या आहेत, हे शिरवाडकरांनी स्पष्ट केले आहे.

कादंबरीविचार व्यक्त करणारे लेखक चंद्रशेखर बर्वे, उषा हस्तक, एस. एस. भोसले, ल. ग. जोग, भालचंद्र फडके, विलास खोले, चंद्रकांत बांदिवडेकर ह्यांच्या नावावर आढळतात. ह्या लेखांमधून श्री. कृ. कोल्हटकर, वि. स. खांडेकर, पु. शि. रेगे, पु. भा. भावे, चिं. त्र्यं. खानोलकर, गो. नी. दांडेकर, ना. सं. इनामदार, त्र्यं. वि. सरदेशमुख, वसंत वरखेडकर ह्या आणि अन्य कादंबरीकारांच्या कादंबरीलेखनावर प्रकाश टाकण्यात आलेला आहे. काही लेख हे त्या त्या वर्षात प्रकाशित झालेल्या कादंबऱ्यांवर साधक-बाधक चर्चा करणारे आहेत. काही लेखांमधून मराठी कादंबरीकारांविषयीचे असमाधान व्यक्त झालेले आढळते. उदा. उषा हस्तक ह्यांनी '१९६६ मधील मराठी कादंबरी' ह्या लेखामध्ये मराठी कादंबरी सामर्थ्यवान, मोठ्या पल्ल्याची, अथांग जीवनानुभवांना स्पर्श करणारी निपजत नसल्याचे मत व्यक्त केले आहे. एस. एस. भोसले ह्यांनी १९७८ मध्ये प्रकाशित झालेल्या कादंबऱ्यांविषयी असमाधान व्यक्त करताना पुढील उद्‌गार काढले आहेत, ''आमच्या कलावंतांना प्रामुख्याने प्रेमाशिवाय काही दिसत नाही; झालेच तर, पुराण-इतिहासकथांचा आसरा घेतल्याखेरीज जमत नाही.'' काही लेखांमधून समीक्षकांनी समाधानाचे उद्‌गार काढले आहेत.




मर्ढेकरांवर 'पत्रिके'मध्ये दोन लेख प्रकाशित झालेले आढळतात. ते पुढीलप्रमाणे : १.'मर्ढेकर आणि दुर्बोधता' - रा. अ. काळेले२० व २. 'मर्ढेकरांची प्रतिमासृष्टी' - निशिकांत मिरजकर२१. ह्या दोन लेखांमध्ये मर्ढेकरांच्या प्रतिमांबाबत दोन विरोधी दृष्टिकोन व्यक्त झालेले दिसतात. काळेले ह्यांनी मर्ढेकरांची कविता नवीन प्रतिमांमुळे दुर्बोध झाल्याची तक्रार केली आहे, तर मिरजकरांनी मर्ढेकरांच्या नवीन प्रतिमांसाठी मर्ढेकरांना श्रेय बहाल केले आहे. ह्यातून मराठी काव्यसृष्टीमध्ये मर्ढेकर आणि तत्सम नवकवींविषयी कशी मतमतांतरे व्यक्त होत होती ते लक्षात येते.





मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

ह्या दृष्टीने भालचंद्र फडके ह्यांचा 'ययाति : काही विचार'२५ आणि विलास खोले ह्यांचा 'दुःखात शांत गातो'२६ हे दोन लेख पाहण्याजोगे आहेत. ह्या दोन लेखांमधून अनुक्रमे वि. स. खांडेकर आणि चिं. त्र्यं. खानोलकर ह्यांच्या कादंबरीलेखनाबाबत समाधान व्यक्त झालेले पाहावयास मिळते.

नाटकासंबंधीचा विचार व्यक्त करणारे काही लेख बा. वा. दातार, रा. शं. वाळिंबे, वि. स. खांडेकर, वि. म. कुलकर्णी, गो. के. भट, गंगाधर गाडगीळ, अश्विनी धोंगडे, अ. म. जोशी ह्यांच्या नावावर आढळतात. ह्या लेखांमधून मराठी दशावतार, 'एकच प्याला', कृ. प्र. खाडिलकरांची नाटके, श्री. कृ. कोल्हटकरांची नाटके, विजय तेंडुलकरांचे 'घाशीराम कोतवाल' ह्या विविध विषयांवर त्या त्या अभ्यासकाचे चिंतन व्यक्त झालेले आहे. पैकी रा. शं. वाळिंबे ह्यांनी 'एकच प्याला' नाटकाची जन्मकथा' ह्या आपल्या लेखामध्ये 'एकच प्याला' ह्या नाटकाचे पहिले हस्तलिखित हे गोव्यात किंवा इंदुरात तयार झालेले नाही, हे स्पष्ट केलेले आहे. तसेच ह्या नाटकाचे पहिले हस्तलिखित पुणे मुक्कामी १ मे ते १३ डिसेंबर १९१७ ह्या कालावधीमध्ये तयार झाल्याचे त्यांनी पुराव्यांसह सिद्ध केले आहे.२७ 'पत्रिके'मध्ये अश्विनी धोंगडे ह्यांचा 'घाशीराम कोतवाल' ह्या विजय तेंडुलकरांच्या गाजलेल्या नाटकावर एक अभ्यासपूर्ण असा लेख पाहावयास मिळतो. 'घाशीराम कोतवाल नाटकातील 'कोरस'चे स्वरूप' हा तो लेख होय.२८ ह्या लेखामध्ये धोंगडे ह्यांनी 'घाशीराम कोतवाल'मध्ये कोरस ह्या नाट्यकल्पनेचे पुनरुज्जीवन झाल्याचे म्हटले आहे. शिवाय 'कोरस' ह्या नाट्यकल्पनेचा मुळापासूनचा इतिहास त्यांनी उलगडून दाखवलेला आहे.

'पत्रिके'च्या काही अंकांमधून चरित्र, आत्मचरित्र, लघुनिबंध, प्रवासवर्णन, वैचारिक लेखन अशा अन्यही साहित्यप्रकारांवरील लेखन प्रकाशित झालेले आढळते. हे लेखन रमेशचंद्र पाटकर, भालचंद्र फडके, गंगाधर मोरजे, आनंद यादव, वि. पु. गोखले, सु. रा. चुनेकर, भास्कर गिरधारी, द. न. गोखले, चंद्रशेखर बर्वे ह्यांच्या नावावर पाहावयास मिळते. पैकी 'मराठी लघुनिबंधाचे जनक वि. स. खांडेकर : का व कसे?' हा आनंद यादव ह्यांचा लेख खळबळजनक ठरला. कारण मराठी लघुनिबंधाचे जनक ना. सी. फडके हेच मानले जात होते. यादवांनी हे आधीचे मत आपल्या लेखामधून खोडून काढले आहे.

**समारोप :**

अशा प्रकारे 'महाराष्ट्र साहित्य पत्रिके'च्या पहिल्या अंकापासून इ. स. २००० पर्यंतच्या, विशेषतः इ.स. १९८० पर्यंतच्या अंकांमधून साहित्यविचाराबद्दल जशी तात्त्विक चर्चा झालेली आढळते तशीच विविध साहित्यप्रकार, विविध साहित्यप्रवाह आणि विविध साहित्यिक, तसेच विविध साहित्यकृती अशा इतरही अनेक बाबींवर चर्चा झालेली दिसते. ही चर्चा जशी लेखांमधून झालेली दिसते तशीच ती ग्रंथपरीक्षणांमधूनही झालेली दिसते. 'महाराष्ट्र साहित्य पत्रिके'ने आपल्या प्रदीर्घ वाटचालीमध्ये काही साहित्यिक, साहित्यप्रकार, साहित्यप्रवाह ह्यांच्यावर २५ हून अधिक विशेषांक प्रकाशित केले आहेत. पैकी ग्रामीण साहित्यावरील जुलै-डिसेंबर १९७६ मध्ये प्रकाशित झालेला विशेषांक, दलित साहित्यावर ऑक्टो.-डिसें. १९८७ मध्ये प्रकाशित झालेला विशेषांक, तसेच गझलेवर ऑक्टो. १९८६ मध्ये प्रकाशित झालेला विशेषांक हे तीन विशेषांक सर्वाधिक अभ्यासपूर्ण आणि म्हणून संग्राह्य झालेले आहेत. प्रारंभीच्या काळामध्ये 'महाराष्ट्र साहित्य पत्रिके'ने ललित साहित्य प्रकाशित करण्यास प्राधान्य दिले होते.परंतु नंतरच्या काळामध्ये वाङ्मयीन दृष्टिकोनातून तिचे अंक प्रकाशित होऊ लागले. 'विविधज्ञानविस्तार'ने इ. स. १८६७ पासून पुढे मराठी साहित्यसृष्टीमध्य जसे आदराचे आणि महत्त्वाचे स्थान निर्माण केले, तसेच आदराचे आणि महत्त्वाचे स्थान 'पत्रिके'ने पुढील काळामध्ये निर्माण केले. 'विविधज्ञानविस्तार'चा वारसा पुढील काळामध्ये 'महाराष्ट्र साहित्य पत्रिके'ने अधिक समृद्ध आणि संपन्न केला. 'महाराष्ट्र साहित्य पत्रिके'चे अंक हे मराठी साहित्याचा अभ्यास करणाऱ्या प्रत्येक व्यक्तीला संदर्भग्रंथ म्हणून उपयोगी पडणारे झाले आहेत ह्यात काहीच शंका नाही.

●

**डॉ. अविनाश सांगोलेकर,**
प्राध्यापक व प्रमुख, मराठी विभाग,
सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठ,
पुणे ४११००७
चलभाष : ९८५०६१३६०२
ई-मेल : avinashsangolekar@unipune.ac.in

**संदर्भ आणि टीपा :**

१. देशपांडे पु. य., 'पुरोगामी वाङ्मयाची लक्षणे' (लेख), अंतर्भूत : महाराष्ट्र साहित्य पत्रिका, पुणे, फेब्रु. १९३८
२. पाहाः भाटे म. गो., 'वाङ्मयीन टीकेची उद्दिष्टे' (लेख), अंतर्भूतः महाराष्ट्र साहित्य पत्रिका, पुणे, जून १९४५
३. पाहाः पानसे मु. ग., 'वाङ्मयविद्या (Philology): स्वरूप व व्याप्ती' (लेख), अंतर्भूत : महाराष्ट्र साहित्य पत्रिका, पुणे, ऑक्टो. १९६९- मार्च १९७०, पृ. ३ - १७
४. केळकर अशोक, 'भाषा आणि साहित्य' (लेख), अंतर्भूत : महाराष्ट्र साहित्य पत्रिका पुणे, ऑक्टो. १९६९- मार्च १९७०, पृ.






राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

१८-८८
५. खोले विलास, 'मराठी समीक्षेतील सिद्धांतविचार' (लेख), अंतर्भूतः महाराष्ट्र साहित्य पत्रिका, पुणे, ऑक्टो. -नोव्हें. डिसें. १९७६, पृ. १३-१६
६. पाहाः कुलकर्णी अनिरुद्ध अनंत, 'मराठी नवअभिजातवाद' (लेख), अंतर्भूतः महाराष्ट्र साहित्य पत्रिका, पुणे, जुलै-डिसें. १९७८, पृ. ३६-४५
७. पाहाः हातकणंगलेकर म. द., 'मर्ढेकर : साहित्यातील सौंदर्य' (लेख), अंतर्भूत : महाराष्ट्र साहित्य पत्रिका, पुणे, ऑक्टो. १९६९ -मार्च१९७०, पृ. ७९-९३
८. पाहाः वारलिंगे सुरेंद्र, 'सामान्य भाषा, समीक्षा आणि मूल्यांकन' (लेख), अंतर्भूतः महाराष्ट्र साहित्य पत्रिका, पुणे, एप्रिल-जून १९७३, पृ.४६-५७
९. कुलकर्णी द. भि., 'समीक्षेची निर्मिती' (लेख), अंतर्भूत : महाराष्ट्र साहित्य पत्रिका, पुणे, जुलै-सप्टें. १९७९, पृ. ४४ - ४६
१०. अधिक तपशिलासाठी पाहा : घांडगे मीरा, 'महाराष्ट्र साहित्य पत्रिका-सूची', महाराष्ट्र
साहित्य परिषद, पुणे, प्रथमावृत्ती : २७ मे २००६
११. पाहाः वाटवे के. ना., 'मृत्युंजय महाकवी' (लेख), अंतर्भूतः महाराष्ट्र साहित्य पत्रिका, पुणे, वर्ष ३९, अंक १५५, ऑक्टो. डिसें. - १९६५, पृ.६९-७२
१२. क्षीरसागर श्री. के., 'केशवसुतांनी केलेल्या क्रांतीचे आकलन झाले आहे काय?' (लेख), अंतर्भूतः महाराष्ट्र साहित्य पत्रिका, पुणे, अंक १५७, एप्रिल-जून १९६६, पृ. ८-१२
१३. पंडित भ. श्री., 'केशवसुतांच्या कवितेचे अन्तःस्वरूप' (लेख), अंतर्भूतः महाराष्ट्र साहित्य पत्रिका, पुणे अंक १५७, एप्रिल - जून १९६६, पृ. १३ -१७
१४. पाहा : पंडित भ. श्री., 'तांब्यांच्या गीतिकाव्याचे बाह्यान्तर स्वरूप' (लेख), अंतर्भूतः महाराष्ट्र साहित्य पत्रिका, पुणे अंक १६९-१७०, एप्रिल- ऑक्टो. १९६९, पृ. १२-२९
१५. पाहाः तेंडुलकर रमेश, 'तांबे यांची गीतिकाव्येः काही विचार' (लेख), अंतर्भूतः महाराष्ट्र साहित्य पत्रिका, पुणे, अंक १८७-१८८, ऑक्टो १९७३-मार्च १९७४, पृ. ८८-९५
१६. खांडेकर वि. स., 'आनंदयात्री तांबे' (लेख), अंतर्भूत : महाराष्ट्र साहित्य पत्रिका, पुणे, अंक १८७-१८८, ऑक्टो १९७३- मार्च १९७४, पृ. ४१-४४
१७. क्षीरसागर श्री. के., 'रोमँटिक प्रेम आणि तांबे' (लेख), अंतर्भूतः महाराष्ट्र साहित्य पत्रिका, पुणे, अंक १९७ -१८८ , ऑक्टो. १९७३-मार्च १९७४, पृ. ४५-५३
१८. काळेले रा. अ., 'तांबेः व्यक्ती आणि काव्य' (लेख), अंतर्भूतः महाराष्ट्र साहित्य पत्रिका, पुणे, अंक १८७-१८८, ऑक्टो १९७३-मार्च १९७४, पृ. ५५-६३
१९. झोकरकर गोविंद 'माझ्या दृष्टिकोणातून तांबे' (लेख), अंतर्भूतः महाराष्ट्र साहित्य पत्रिका, पुणे, अंक १९५-१९६, ऑक्टो १९७५-मार्च १९७६ पृ. ८२-८६
२०. काळेले रा. अ., 'मर्ढेकर आणि दुर्बोधता' (लेख), अंतर्भूतः महाराष्ट्र साहित्य पत्रिका, पुणे, अंक १७५-१७६, जाने.-जून१९७१, पृ. १५२-१५७
२१. मिरजकर निशिकांत, 'मर्ढेकरांची प्रतिमासृष्टी' (लेख), अंतर्भूतः महाराष्ट्र साहित्य पत्रिका, पुणे, अंक १९७, एप्रिल-जून १९७६, पृ. ३८-४६
२२. देशमुख बलवंत, 'आजची मराठी लावणी' (लेख), अंतर्भूतः महाराष्ट्र साहित्य पत्रिका, पुणे, अंक २०४-२०५, जाने.-जून १९७८, पृ. २७-३७
२३. पाहाः अदवंत म. ना., 'दिवाकर कृष्णांची कथा' (लेख), अंतर्भूतः महाराष्ट्र साहित्य पत्रिका, पुणे, अंक १७३, एप्रिल-जून १९७०, पृ. ५६-६०
२४. पाहाः शिरवाडकर वि. वा., 'कै. लिमयेः आधुनिक मराठी कथेचे जनक' (लेख), अंतर्भूतः महाराष्ट्र साहित्य पत्रिका, पुणे, अंक १७४, जुलै-सप्टें. १९७०, पृ.६१-६८
२५. फडके भालचंद्र, 'ययाति : काही विचार' (लेख), अंतर्भूतः महाराष्ट्र साहित्य पत्रिका, पुणे, अंक १९५-१९६, ऑक्टो. १९७५- मार्च १९७६, पृ. २१-२६
२६. खोले विलास, 'दुःखात शांत गातो'(लेख), अंतर्भूत : महाराष्ट्र साहित्य पत्रिका, पुणे, अंक १९७, एप्रिल-जून १९७६, पृ. ७-१५
२७. पाहाः वाळिंबे रा. शं. 'एकच प्याला' नाटकाची जन्मकथा', (लेख), अंतर्भूत : महाराष्ट्र साहित्य पत्रिका, पुणे, अंक १७८, जुलै-सप्टें. १९७१, पृ. ८४-९९
२८. पाहाः घोंगडे अश्विनी, 'घाशीराम कोतवाल नाटकातील कोरस'चे स्वरूप (लेख), अंतर्भूत : महाराष्ट्र साहित्य पत्रिका, पुणे, अंक १९५-१९६, ऑक्टो. १९७५ ते मार्च १९७६, पृ. ८८-९१
२९. पाहा : यादव आनंद, 'मराठी लघुनिबंधाचे जनक वि. स. खांडेकर : का व कसे?' (लेख), अंतर्भूत : महाराष्ट्र साहित्य पत्रिका, पुणे, अंक १९५-१९६, ऑक्टो. १९७५- मार्च १९७६, पृ. ३३-४२
३०. प्रस्तुत शोधनिबंध सिद्ध करताना मला माझे स्नेही डॉ. शिरीष गोपाळ देशपांडे, माझा विद्यार्थी अतुल गुळाळे, तसेच माझा साहाय्यक ज्ञानेश्वर कहाळेकर अशा तिघांचे सहकार्य लाभले. तसेच दोन संदर्भसाधनांचा फार उपयोग झाला. त्यांचा तपशील असा :
१. घांडगे मीरा (सूचिकार), 'महाराष्ट्र साहित्य पत्रिका सूची', महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे, प्रथमावृत्ती : २७ मे २००६
२. गुरव घनाजी शंकर (प्रबंधलेखक), 'महाराष्ट्र साहित्य पत्रिकेचे साहित्यसमीक्षेच्या संदर्भात वाङ्मयीन कार्य''(१८१३-१९८०), मुंबई विद्यापीठाला पीएच.डी. पदवीसाठी सादर करण्यात आलेला प्रबंध, मार्गदर्शक : भास्कर गिरधारी, नोव्हें. २००४

('साहित्यचिंतन'मधून साभार)



अनुक्रमणिका
मराठीचा विकासः महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद



विशेष लेख

किशोर सानप

# तुको बादशहा माणूसपणाच्या कविता

कवी श्रीकृष्ण राऊत यांचा 'तुको बादशहा' हा कवितासंग्रह अक्षरमानव प्रकाशनाकडून प्रकाशित झाला आहे. या कवितासंग्रहाचे अंतरंग उलगडणारा संतसाहित्याचे ज्येष्ठ अभ्यासक-समीक्षक डॉ. किशोर सानप यांचा हा लेख.



कवी श्रीकृष्ण राऊत हे कविनाम मराठी भाषकांना सुपरिचित आहे. बहुतांश कविता छंद-वृत्तात लिहिणारा आणि कवितेला निखळ, शुद्ध काव्यरूप देणारा कवी म्हणूनही त्याची ख्याती आहे. अक्षर मानव या प्रकाशन संस्थेने अत्यंत देखण्या रूपात 'तुको बादशहा'चे प्रकाशन केले आहे. श्रीधर अंभोरे यांचे अर्थघन प्रतीकात्मक मुखपृष्ठ आणि रेखाटने व रवीन्द्र सातपुते यांचे अक्षरलेखन असा अपूर्व योगही साधला गेला आहे. विशेषतः संत तुकारामांचे दहावे वंशज गुरुवर्य डॉ. सदानंद मोरे यांनी प्रस्तावनेत तुकोबांच्या काव्य परंपरेत कवी श्रीकृष्ण राऊतांनीही कविता लिहिल्याचे मत मांडले.

अकोला जिल्ह्यातील पातुर कवीचे जन्मगाव. वेटाळात देवी भवानीचे ठाणे. दसऱ्याच्या रात्री देवीची पालखी उचलताना लोकांनी केलेला घोष-सदाऽऽऽनंदीचाऽऽऽ उदोऽऽऽ! बोऽऽऽल तुकोऽऽऽबादशाऽऽऽकी जयऽऽऽ! कोवळ्या वयात लोकसंस्कृतीतल्या तुको बादशहाने मनात घर केले. तेच या संग्रहाचे शीर्षक झाले- तुको बादशहा! कवीच्या कोवळ्या मनात संत तुकोबांनी घर केले. कवीनेही तुकोबांच्या विठ्ठल परंपरेच्या थाटातच तुकोबा आणि विठोबांशी काव्यसंवाद साधला. अर्थातच कवीची जडणघडण ही लोकसंस्कृती आणि लोकसंचिताच्या मुशीतच झालेली आहे. कालनिहाय लोकसांस्कृतिक महत्ता कवीने आपल्या सबंध काव्यलेखनातून आजवर उद्धृत केली आहे. अर्थातच कवीचा हा संवाद तुकोबा-विठोबांशी होत असला, तरी संवादाचे खरे माध्यम लोकमन हेच आहे.

तुकोबांनीही आपल्या समकालात लोकमनाशी संवाद अभंगनिर्मितीतूनच उजागर केला होता. कवीनेही आपल्या समकालातल्या लोकजीवनाशी साक्षात संवादी पातळीवर रक्तसंबंध मानून कवितेतून तो उजागर केल्याचे दिसते. तुकोबांची कविता ही जशी





अनुक्रमणिका



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

महाराष्ट्र साहित्य परिषद

समकालीन असूनही कालातीत परिमाण जगासमोर ठेवते, तशीच राऊत यांची कविता समकालीन असून कालातीत परिमाण रसिकांसमोर ठेवते.

*तुको बादशहा देई शब्ददान करी धनवान लेखणीला*
*अगा शब्दराजा होई कृपावंत ओत आशयात पंचप्राण*
*नामयाने तुज सांगितले गुज पेर तेच बीज अप्रतिम*
*परम अर्थाची पायाखाली वीट बसवावी नीट घडवोनी*
*श्लील-अश्लीलाचा करी तू निवाडा*
*भाषेच्या कवाडा उघडोनी...*

तुको बादशहाला काव्यगुरू मानून, त्याच्याच भाषेच्या कवाडातून कवीने आपली काव्यलेखणी परजली आहे. तीक्ष्णता, उग्रता, तोंडफोड, रोखठोक, न्यायनिवाडा या अंगानेच ती आधुनिक समकालातील जीवन जाणिवांना पोखरणाऱ्या भाषाकीटकांचीही वाट लावते. नादमाधुर्य आणि भावगर्भताही अनुभूतीच्या कळवळ्यातून लोकमनावर उमटविते. लोकसंचिताच्या कवाडातूनच अभंगांचे विविध प्रयोग करीत, लोकसंचिताला अधिकाधिक कालनिहाय परिमाणे देऊन व्यक्त करते. उपमा, दृष्टान्त, बोलीभाषेतील नादमाधुर्य निर्माण करणारी भाषिक रूपे सहजच कवितेच्या आकृतिबंधात अढळ नेतृत्व करतात. समाजाला वठणीवर आणण्याचेही कविकार्य करतात. समाजाच्या मनात दया, क्षमा, शांती, बंधुभाव, करुणा आदी जीवननिष्ठ भावभावनांचीही मानवतावादाच्याच परिप्रेक्ष्यात पेरणी करतात. माणूसपणावर प्रेम करणारी आणि नितांत श्रद्धा व्यक्त करणारी कविता तुको बादशहातून साकार झाली आहे. संतत्व आणि कवित्व यांचे अद्वैत जसे संतकाव्यातून प्रकटले तसे कवित्व आणि मानवीयत्व यांचे अद्वैत कवी श्रीकृष्ण राऊतांच्याही कवितेतून प्रकटले आहे.

**शब्दांपाशी ठेव जीव तू गहाण**

तुको बादशहा कवितेचा पंचप्राण. श्लील-अश्लीलाचा निवाडा करण्याचे अधिकार कवी अंतर्मनाला अणुरेणुसारखे व्यापलेल्या तुकोबांना बहाल करतो. विठोबांच्या पायाखाली अठ्ठावीस युगांपासून मुक्तीची वाट पाहत असलेली परम अर्थाची वीटही कवीने काव्यसृजनाला पायाभूत मानली आहे. 'मुखातून माझ्या बोले तुकाराम, तोच आत्माराम अभंगाचा।' संत तुकाराम आहेत तरी कसे? 'कवितेचा देव तूच एक तुक्या, बाकी साऱ्या नख्ख्या कापसात। तूच एक राजा नगदीचे पीक, बाकी झिकझिक उधारीची। तूच कलदार रोकडीचा दाम, बाकी जोडकाम कुसरीचे। तुकाराम श्वास तुकाराम ध्यास, सदा आसपास तुकाराम। काव्याच्या पापाचे भोगतो मी फळ, तुकाराम छळ करी माझा, म्हणे घालविले बेचाळीस वाया, अखेरीस पाया सापडला...' अंतर्बाह्य तुकोबा रोमारोमांत भिनल्यावर कवितेचे पाप करायचे







अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

महाराष्ट्र साहित्य परिषद

नाही म्हणून अखेरीस कवीला तुको बादशहाच्या सृजननिमित्ताने कवितेचाच पाया सापडतो.

साठोत्तरी मराठी कवितेत तुकोबांच्या काव्यकुळात कविता लिहिणारे भरपूर कवी सापडतात. 'बांध ऐपतीने चिरेबंदी वाडा, हुड्यावर हुडा चढवावा। शब्दांपाशी ठेव जीव तू गहाण, तुला माझी आण तुका म्हणे...' तुकोबांच्या काव्यकुलाशी रक्तसंबंध मानून, शब्दांपाशी जीव गहाण ठेवून, समकालातील जीवनजाणिवांना आणि जीवनमूल्यांना तुको बादशहाच्या भाषिक आणि वाङ्मयीन परंपरेत अभंग शैलीचे कालिक प्रयोग करून, काव्यबंधातून लौकिकालौकिक पातळीवर व्यक्त करण्याचा पाया मात्र कवी श्रीकृष्णाला सापडल्याचे दिसते. या कवीला तुका म्हणे ही नाममुद्राही तिच्यातील अंतर्बाह्य प्रतिभासामर्थ्याने गवसली आहे. काव्याच्या पापाचे फळ भोगताना तुकारामाने केलेला छळही कवीला निखळ, शुद्ध काव्यसृजनाची प्रातिभ पायवाट सोडू देत नाही. तुकोबांच्या काव्यकुलाशी अद्वैत साधणाऱ्या असाधारण काव्याभिव्यक्तीचे समकालातील उदाहरण म्हणून तुको बादशहाचा विचार करावा लागतो.

**घेई आता पीक मनाजोगे**

कोणत्याही काळात सुष्ट विरुद्ध दुष्ट संघर्ष सुरूच असतो. मानवतावादाचे रक्षक दुष्टांना वठणीवर आणण्यासाठी कार्यरत असतात. आधुनिक काळातही मानवाच्या जीवनात मूलभूत गरजांचा अभाव आणि असुरक्षितता कायम आहेच. सत्तांधता, धर्मांधता, जातीयता, विषमता, असमानता, दहशत, भय आदी कारणे प्रत्येक काळात आपसूक चालत येतात. संत आणि महापुरुष 'रात्रंदिन आम्हा युद्धाचा प्रसंग' मानून संघर्षरत असतात, अंतर्बाह्य जग आणि मनाची तपासणी करीत असतात. आधुनिक काळात संत-महापुरुषांची भूमिका साकार करताना, कवी-लेखक समाजात ज्ञान विचारांची-न्याय्य विचारांची पेरणी करून, मानवतावादाच्या भूमीचे संगोपन करतात. दुष्टांना शह देण्याच्या परंपरेतच लेखक-कवींना आपली लेखणी पाजळावी लागते. 'मिळाला अखेर हक्काचा आसरा, तुकोबा सोयरा झाला माझा...उशिरा पटली मातीची ओळख, घेई आता पीक मनाजोगे...' ठायी ठायी मन आणि लेखणी शुद्ध केल्यावर, तुकोबांनी दाखविलेल्या वाटेनेच कवी शब्दास्त्रे परजून 'फटकळापाशी जाई फटकळ, बोलणे सकळ तोंडफोड... जीवावर उभा बंदुकीचा घोडा, नरमेध खडा दारापाशी...' आधुनिक काळातल्या दुष्ट प्रवृत्तींचा समाचार घेताना दिसतो. सर्वहारा माणसाचे दुःखमूळ त्याच्या संसारात दडलेले असते. सुखाचा संसार करताना त्याची तारांबळ उडते.

*असा संसाराचा दंड थंड करी सारे बंड*
*काय सांगू त्याची गत करी जितेपणी खत*
*असा तापे त्याचा ताप करी जीवनाची वाफ*
*केला केला त्याने घात नेला प्राण हातोहात...*

आधुनिक काळातील समस्यांशी झुंजताना सर्वहारा माणसाच्या जीवनाची सतत पडझड होताना दिसते. 'वांझोटी नव्हाळी एक तारखेची पाळी, भविष्याचा निधी सरे वर्तमानाआधी, भागवोनी जिणे केले गुणाकार, राखेत अखेर उरे शून्य, सूचू देत नाही आकड्यांचा खेळ कसा रोजमेळ जुळवावा, नाव गोडेतेल खाता तोंड कडू, मिळविणे सोपा वैकुंठाचा पास, शाळेत प्रवेश अवघड, वाजतात कानी देणग्यांच्या घंट्या, जिणे झाले मज कुसळाची शेज, रॉकेलची मिठी पेट्रोलच्या गळा, श्वासा येती कळा भरधाव, जोडवे मोडून त्याले बिलवर, पाडुनिया घर उभे फ्लॅट, केबलकाचणी सुरू रात्रंदिन, डोळे आणि स्क्रीन धुमश्चक्री, खोटानाटा लोभी धंदा शेंडी लावून गोविंदा, जाती-जातीमधे वाटू कुलनामे पुण्य लाटू, येताजाता क्षण हाणे मोठमोठे घरावर गोटे रात्रंदिन, धारीवर चाल म्हणे तलवार, पोटी आरपार दहशत साहेबांच्या लाथा मानाव्यात गोड, आले जरी फोड ढुंगणाला नापिकीचे सालमान मानपान सतरा, उदकाची चोरी करी मारामारी, पाण्यासाठी शुद्ध नियोजित युद्ध...' समकालातल्या मानवी समस्या आणि जीवनमूल्यांच्या सतत होत जाणाऱ्या पडझडीला कुठे तरी थांबवता आले पाहिजे. सर्वहारा माणसांच्या आयुष्यात अन्न, वस्त्र, निवारा, सुरक्षितता ह्याच मुख्य गरजा असतात. त्यांच्याच परिपूर्तीसाठी त्यांना सतत संघर्षरत राहावे लागते.

राजकीय आणि भांडवली सुखलोलुप व्यवस्था कधी धर्म तर कधी जाती, तर कधी गरिबी, अशा कारणांनी सर्वहारा माणसांचे भौतिक आणि मानसिक शोषण करीत असते. जीवनमूल्यांच्या प्रदूषणाचा झरा वरपासून खालपर्यंत वाहत येतो. जीवनमूल्ये बदलली की जीवनमानही बदलत जाते. मानवतावादी मूल्यांना पायदळी तुडविण्याचा सोस वाढत जातो. कवीनेही अमानुषतेला विरोध करीतच मानवतावादी आणि नैतिकतावादी मूल्यांचे संस्कार समाजावर करण्यासाठी तुकोबांकडून मिळालेले शब्दसंचित आणि शब्दास्त्रे, कवितेच्या माध्यमातूनच रोखठोकपणे वापरली आहेत. मातीची ओळख पटल्यामुळे मनाजोगे काव्यपीक घेण्याचे आत्मबळही कवीला प्राप्त झालेले आहे.

**खाजवाया आले नख झाले सुख सागर**

कवी आधुनिक युगात विवेकवादी आणि विज्ञाननिष्ठ दृष्टिकोनाच्या परिप्रेक्ष्यातच जीवनातल्या दैनंदिन जीवन व्यवहारांकडे पाहतो. 'हुबेहूब झालो तुझियापासून, तुझाच



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

कलोन आहे ना मी', याची जशी कवीला जाण आहे तसेच, 'खाजवाया आले नख झाले सुख सागर', याचेही त्याला भान आहे. 'ढुंगणाला पुरे हात आवाक्यात मंगळ, विज्ञानाला पूर चढे मुंगी बुडे मुतात', ही आधुनिक काळातल्या माणसांची गत. 'काकडी दोडका लागे वेलीवर, तशी का लेकरे लागतील?' असा नैसर्गिक सत्याचा स्वीकार करायला लावणारा प्रश्नही कवी उपस्थित करतो. 'उरली ना फांदी पानातली दाट, पक्षिणी घरटं बांधी कोठे?' सृष्टी पर्यावरणातील वृक्षवल्लींचा विनाश करून वसाहतवाद बोकाळल्यामुळे 'वृक्षवल्ली आम्हा सोयरे वनचरे, पक्षीही सुस्वरे आळविती', ही भावनाच लोप पावली आहे. 'व्याकुळले हिंडे वनी वनचर, रातरातभर शोधे पाणी...' कवीचे अंतःकरण तिळतिळ तुटते.




एकविसाव्या शतकाने केवळ ग्लोबल व्हिलेज निर्माण केले असे नाही, तर चंद्र-मंगळावरही माणूस पोहोचला आहे. रोबोट संस्कृती चंगळवादातून उदयाला आली. माणसांचा माणसांशी होणारा सौहार्दपूर्ण संवादही खुंटला. माणसांची आतून बंद बेटे तयार झाली. 'दोन्ही डोळ्यांतून वाहे चंद्रभागा, घडते निर्जला रोज एकादशी, वावर उपाशी तहानले' शेतीमातीचीही हेळसांड झाली. भांडवलीकरण आणि वैज्ञानिक प्रगतीने सर्वहारा माणूस दुःखाच्या कुळाशी, मृत्युपंथीच पोहोचला. 'लाव रोज आता नोटांचे तू आस, होशील खलास हत्तीपायी...' उरफोड गरजांची पूर्ती करताना माणूस मेटाकुटीला आला.

माणसांची विविध सुष्टदुष्ट रूपंही कवीने अभंगातून मांडली आहेत. अनादी काळापासून माणूस अहंकार आणि स्वार्थपरायणतेवर विजय मिळवू शकला नाही. माणसेच माणसांचे वैरी होतात. 'भिजले शेपूट आतडे पिळले, इमान वाळले थारोळ्यात. टोळांचे टोळके भैरव बेरके. वारियाला काय मारशील लाथा, फोडशील माथा मोक्षावर. आकाश ठेंगणे अहंकाराहून, ज्ञानाचाही खून पाडशील. कोण मुखवटा कोणते श्रीमुख? पटावी ओळख अंतर्यामी. वेचता न येती गव्हातले खडे, चकव्यात पडे वाटचाल...कमलनयन युगावरचं कवीचं भाष्यही मार्मिक आहे.

*कमलनयन,*
*दृष्टी चिखलाची खाण*
*चाफेकळी नाक,*
*मागे सुवासाची भीक*
*मुखी गोड बोल,*
*नाही अंतरात ओल*
*बहुश्रुत भोळा,*
*कानी कापसाचा बोळा*
*देह हत्तीवाणी,*
*मन कोते केसाहुनी...*

**अवघ्याचे आहे एक दुःखमूळ**

आशा-आकांक्षा-अपेक्षा हीच खरे तर जगभरच्या दुःखाची जननी आहे. कुणालाच ती स्वस्थ जगू देत नाही. 'अवघ्याचे आहे एक दुःखमूळ, अपेक्षिता फळ चुके वर्म...' दुःखाचे आणि तृष्णेचेही तेच मूळ आहे. यामुळेच जगभर माणसांचे वर्म चुकत जाते. चुकांचेही तेच मूल वर्म आहे. 'घेई आता कोण तुझा निका वाण? बुडाले दुकान तुकारामा...हिसकून थान वासरापासून, दुधाचे दुकान फायद्यात...नोटा छापण्याची कला अवगत होवो मला,' हीच आजच्या जगण्याची खरी हकीकत आहे. खरे तर माणुसकीचेच दुकान बुडाले आहे. माणुसकीला गिळणारी केवळ फायद्याची दुकाने जगभर थाटली गेली. 'वैराग्याची धाव बिछान्यापर्यंत, विचारांचा अंत भावनेत' झाल्याचाच हा काळ आहे. 'माणसाच्यावाणी माणसात राही, नाही तर नाही घडगत' हे विठोबाला सहज सांगता येते. माणसांना मात्र ते कोणत्याच काळात कधी पटले नाही. शेवटी, 'मन भ्रमाचे भांडार, त्याची किमया अपार' हेच खरे. 'सरो आले आता श्वासांचे इंधन, दुःखाचे चुंबन घेता घेता, बसे एका जागी थकलेले ढोर, नाही अंगी जोर उठावया' ही सर्वहारा माणसाची गत. सर्वहारा माणसांविषयी अपार करुणेचा आर्त झरा कवितेतून वाहताना दिसतो. कवी सर्वहारा माणसाची कड घेऊन विठ्ठलाशी संवाद साधताना त्यालाही लौकिक जगण्याचे प्रश्न सोडविण्याची विनवणी करतो-

*समाधीच्या बड्या बाता सांगू नको भगवंता*
*मोक्ष, मुक्ती-आश्वासन लबाडाचे आवतन*
*उगा पाडू नको कीस प्राण झाला कासावीस*
*भुकेसाठी चतकोर असो शिळा वेळेवर*
*वाळवंटी जिता झरा लाव एक तरी खरा*
*नाही तर झटपट सोड भिवरेचा तट...*

भूक हेच सर्वहारा माणसाचे परमोच्च जगणे आहे. मोक्ष-मुक्ती ह्या पोट भरलेल्यांच्या लीळा आहेत. कोणत्याही धर्मात



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

आणि देवात शिळेतून लीळेत येण्याचे-साक्षात लौकिकात अवतरून लोकांच्या जगण्याच्या समस्या दूर करण्याचे सामर्थ्य नसते. ज्यांच्या प्राथमिक गरजा पूर्ण होतात त्यांना मोक्ष-मुक्तीची चाड असते. तुकोबांना अनुभवाने हे धर्मसत्य आणि देवसत्य जाणवल्यामुळेच त्यांनी रंजल्या-गांजल्यात देव शोधण्याचा परमधर्म जगाला सांगितला होता. कवीही मानवतावादी परमधर्माचाच संदेश लोकांना समकालात देतो आहे.

**कोणी चालवितो भिंत, कोणी बसे विमानात**

लोकांचे धार्मिक असणे आणि धर्मव्यवहार-कर्मकांडे खोटीच असतात. मानवतेचा कळवळा त्यात नसतोच. धर्मांधता आणि हिंसा यांनी व्यापलेला धर्म कधीच मानवाला मोक्षमुक्तीचा मार्ग दाखवीत नसतो. विषमता आणि सत्तांधता हीच दोन मूलतत्त्वे ह्या अमानुष धर्मांधतेच्या पायांमध्ये रुजलेली असतात. सामान्य निरपराध माणसे बळी पडतात. सत्तांध लोकांच्या सत्तेच्या पोळ्या सर्वहारा निरपराध माणसांच्या मढ्यांवर शेकल्या जातात. 'ऊठ माझ्या जीवा चाल बिगीबिगी, उरला ना जगी कळवळा' हे आजचे वास्तव आहे. 'मीच माझा देश मीच माझा धर्म, वेद-गीता-वर्म ठावे मज. मला विचारून उगवतो सूर्य, चुकण्याचे धैर्य नाही त्याला...बेडकाची उडी काय गाठी पैलथडी? अहंकारी मन तसे दूर देवपण...काळ्या नि पांढऱ्या नवविध गोट्या, खेळतात खोट्या रातंदिस...' समाजावर धर्मसत्ता आणि राजसत्ता गाजविणाऱ्यांची ही अहंवृत्ती पाशवीपणाचे द्योतक असल्याचाच जगाचा आजवरचा इतिहास राहिला आहे. आजच्या धर्मांध कर्मकांडं आणि धर्माचा व्यापार करणाऱ्या धर्मगुरू-धर्ममठबाजीला कवीने प्रखर विरोध केला आहे. धर्माचे व्यापारीकरण आणि बाजारीकरण करून पिढ्यान्‌पिढ्यांची पोटभरू सोय करण्याच्या आध्यात्मिक वृत्तीला कवीने जबर शह दिला आहे. अंदरकी बात काही औरच असल्याचे उजेडात आणले आहे.

*आम्ही असे जुने पापी संत सारे घालू खापी*
*जाती-जातीमधे वाटू कुलनामे पुण्य लाटू*
*नाही अधिकार तरी भाष्य करू भरजरी*
*चिकटवू थोर थोर नवनवे चमत्कार*
*कोणी चालवितो भिंत, कोणी बसे विमानात*
*याचे त्याचे स्थापू मठ, भरू पिढ्या-पिढ्या पोट...*

माणूसपणातून जेव्हा सत्य, अहिंसा, शांती, समता निखळून पडते तेव्हा माणसेच माणसांना पायदळी तुडवून अमानुषपणे मानवतावादी जीवनमूल्यांच्या पतनाला जबाबदार ठरतात. स्व-अस्तित्वाची ओळख हाच खरे तर एकमेव जीवनमूल्यांवर श्रद्धा बाळगण्याचा पर्याय असतो. संतांची भक्तिचळवळ ही स्व-अस्तित्वाची ओळख पटविण्यासाठीच अस्तित्वात आली होती. अंतःकरणात समत्व आणि ममत्वाच्या ऊर्मी निर्माण करण्याची, चित्तशुद्धीची मानुषप्रक्रिया म्हणून संतांनी लोकमानसात भक्तिमार्ग रुजविला होता.

रंजल्या-गांजल्यात देव शोधणाऱ्या तुकोबांनी भक्त-भगवताचे अद्वैत मानून मानवतेच्या सेवेचा मूलमंत्र समाजाला दिला. 'गंगेमध्ये रोज ढुंगण जो धुतो, त्यास काय नेतो सुखे यम? आजवर जे जे काशीमध्ये मेले, जीव-जंतू गेले काय स्वर्गी?' असे अनेक नैतिक आणि वास्तविक प्रश्न कवी लोकांना विचारतो. मोक्ष-मुक्ती-पुण्य-स्वर्ग-नरक आदींचाही पुनर्विचार करण्याचा सल्ला देतो. सेवा आणि मुक्तीच्या अद्वैताची मांडणी अभंगातून करताना कवीनेही 'मानवतेच्या सेवेतूनच माणसाला उन्नत होता येणे शक्य आहे' असे स्पष्टपणे नमूद केले आहे. अर्थातच जीवनाचं लौकिक अध्यात्मच कवीने आपल्या कवितेतून मांडलं आहे.

**सत्य खरी पूजा, सत्य खरा देव**

धर्माने माणुसकी जपण्याचा संदेश दिला. धर्मांधतेने माणुसकी जमीनदोस्त करण्याचा आदेश दिला. सर्वहारा माणसे भोळीभाबडी असतात. धर्म जगण्याचा व्यवहार मानून धर्मकायद्यांचा अन्याय-विषमता ते सहन करतात. धर्मकायदे राबविणाऱ्यांना धर्माचे राजकारण करून आपली पोळी शेकायची असते. वारकरी सर्वधर्मसमभाव मानणारी मानवतावादी परंपरा मानली जाते. भाबडेपणा, गरिबी, अभाव, विषमतेत जगणाऱ्या कुण्याही धर्माची-जातीची माणसे श्रद्धाशील आणि अनुसरणप्रिय असतात. यांच्याच भरवशावर धर्माचे राजकारण केले जाते. गरिबी अभावात जगणाऱ्याला कोणतीच जात आणि धर्म नसतो. तो तरी धर्मदोषांना बळी पडतो. रोजच्या जगण्याची तजवीज करताना कुठे तरी मरून पडतो.

*बंदा टोचलेला कान ऐकी अजानाची तान*
*तळलेल्या पापडाने केले चुरा बालपण*
*बुरख्याच्या जाळीमागे ओले पदराचे धागे*
*एकादशी-रमजान बुडे निर्जलात प्राण...*

कवीची बहुतांश रचना लोकांना धर्मसत्य आणि देवसत्य सांगण्याचा प्रयत्न करते. तुकोबांशी आणि विठोबांशी संवाद साधताना ही सर्व रचना भक्तीच्या आर्त कळवळ्यातून होणे अस्वाभाविक नाही. आध्यात्मिक भूक ही जगणाऱ्या जिवंत माणसांच्या जगाची सनातन भूक आहे. भक्तीतूनच ही भूक भागविण्याचा सर्वधर्मसमभाव संतांनी जगाला दिला. धर्म



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

आणि अध्यात्माच्या क्षेत्रात ज्ञानदीप लावून समाजात पसरलेला आध्यात्मिक आणि धार्मिक अंधारही दूर केला. समकालात तोच मार्ग कवीनेही अंगीकारल्याचे दिसते. धर्म आणि देवाचा धंदा करणाऱ्या व्यवस्थेविरुद्ध संतांनीही आपल्या काळात धर्म रक्षावयासाठी करणे आटी आम्हासी, असे म्हणतच खऱ्याखोट्याचा निवाडा करून जगाच्या मानवी अंतरंगात ज्ञानदीप उजळून जीवनमानाला प्रकाशमान केले. 'सत्य-असत्याचा निवाडा समकालात करताना कवी म्हणतो, सत्य नसो कोण्या जातीचे गुलाम, होवो ना हराम सत्य कधी, सत्य नसो कोण्या धर्मांचे बटीक, गुह्याचे स्फोटक असो सत्य...' सत्य ही कोणाची मालमत्ता नसते. सत्यावर कोणी बंदीही घालू नये. सत्य समतेची संधी असते. नर-मादी असे कोणतेही भेद सत्य करीत नाही. सत्य सूर्यप्रकाशाइतके पारदर्शक आणि प्रकाशमान असते. 'सत्य खरी पूजा, सत्य खरा देव, बाकी उठाठेव असत्याची...' सत्यासाठी माझी शब्दविवंचना, या थाटातच सत्य-असत्याचे कार्यक्षेत्रही कवीने विशद केले आहे. शेवटी सत्य हाच धर्म, सत्य हीच भक्ती. सत्याचे दर्शन हेच अध्यात्माचे आणि धर्माचेही कार्य. कवीने सत्याची परंपरा, आधुनिक काळातील सार्वजनिक सत्यधर्माचे उद्गाते महात्मा ज्योतिबा फुल्यांपर्यंत समकालीन आणि समकक्ष मानली आहे.



**तुको बादशहाचे समकालीनत्व**

तुको बादशहा या काव्यसंग्रहात कवीने १०० अभंगांचा समावेश केला आहे. संतपरंपरेतील भक्तिमार्गी रचनाकारांच्या ओवी-अभंगादी अक्षरछंदांचा लोकमानसावरील प्रभाव आजही कालसापेक्ष असल्याची समकालीनता कवी श्रीकृष्ण राऊतांच्या तुको बादशहातून मुखर झाली आहे. लोकजीवनातील उदाहरणे, दृष्टान्त, म्हणी-वाक्प्रचार, प्रतिमासृष्टी, रचनेच्या गर्भातील आर्त कळवळा, भक्तिमार्गी भाषिकता, आंतरसंवादाची कारुण्यलय, लौकिकालौकिकाला आरपार भिडणारी समकालीन आधुनिक भाषिकता आदींनी कवीची अभंगरचना बादशहाच्याच थाटात झालेली आहे. आधुनिक आणि ग्लोबल युगातील भौतिक-आधिभौतिक, मानसिक-शारीरिक, धार्मिक-आध्यात्मिक, लौकिक-पारलौकिक अशा जगड्व्याळ प्रश्नांच्या तळाशीही कवी पोहोचला आहे.

उदाहरणार्थ, 'वेश्येच्या रक्तात आढळो ना एड्स, मेंदूला कवटी बुबुळाला खाच सोसण्या दे पाठ कासवाची, ग्लिसरीन आसू पापण्यात, युगे अठ्ठावीस उभा विटेवरी खरा धन्वंतरी एकमेव, पाण्यासाठी शुद्ध नियोजित युद्ध, हासत ऐकाव्या साहेबांच्या शिव्या कानावर ओव्या अमृताच्या, करी पुन्हा त्याच चुका घेई आभाळाचा मुका, घारीवर चाल म्हणे तलवार पोटी आरपार दहशत, तिच्यापाशी दोन सरे एक उरे केवळ, पालीच्या जबड्याखाली जसा किडा करी तडफडा अखेरचा, मुकण्या हत्तीचे जुगणे निष्फळ तैसाचि उथळ भक्तिभाव, आपली ती पाठ आपल्या लोचना तसाच दिसेना आत्मदोष, त्रिखंडात नाही स्वभावाला दवा सप्रेम वागवा लागे तया, परीटघडीचा शुभ्र अंगरखा वर जाता काखा दावी डाग, मुखी नामाचा संबळ मनी सावळा गोंधळ, कंचीतले फूल काढण्यास गेलो फोडूनि पावलो दोन भांगा, अवघ्याचे आहे एक दुःखमूळ अपेक्षिता फळ चुके वर्म, उंटाच्या फेंडीचा घेऊ पाहे मुका नाही त्याच्या दुःखा पारावार, कुत्र्याचे तोंड चघळे हाडूक तसे माझे मुख सुखावते, उरला न काही आपपर भाव अशी माझी हाव बळावली, केल्या लटपटी रांडापोरांसाठी प्राणाचे शेवटी तेच वैरी... अशा अनेक दृष्टान्तादी उदाहरणांतून कवीने मानवी जीवनातील शाश्वत गुणसूत्रांची मांडणी समकालाच्या परिप्रेक्ष्यातच केलेली आहे.

समकालाची चिकित्सा करताना पारंपरिक संज्ञावलींना समकालाची परिमाणे देऊन माणूस हेच या जगातील श्रेष्ठ मूल्य असल्याचा श्रद्धाभाव कवीने अभंगांच्या रचनेतून उजागर केला आहे. संतांची कविता जशी कालातीत माणूसपणाची गाणी गाताना दिसते, तसाच कवीही माणूसपणाचीच समकालातीत गाणी गाताना दिसतो. समकालाला कालातीत करण्याचे आधुनिक उदाहरण म्हणून कवी श्रीकृष्ण राऊतांच्या तुको बादशहाचा निश्चितच विचार करता येईल...

●

**डॉ. किशोर सानप**
चलभाष - ९४२२८९४२०५
dr.kishorsanap@gmail.com



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद



विशेष लेख

रूपाली शिंदे

# वैचारिक लेखनातील मर्मदर्शी प्रतीके



बरठ्यावर' हा डॉ. सदानंद मोरे यांचा लेखसंग्रह अभ्यासताना त्यातील सामाजिक, सांस्कृतिक संदर्भ लक्षात घ्यावे लागतात. त्यामुळे या लेखांचा विचार केवळ एका विशिष्ट लेखापुरताच मर्यादित स्वरूपात करून चालत नाही. संपूर्ण लेखसंग्रहाच्या विविध विषयांचा परस्परांशी असलेला सहसंबंध आणि सामाजिक-सांस्कृतिक संदर्भांमधून रचलेला विचारव्यूह किंवा विचारदृष्टी असा एकसंघ विचार करून या लेखसंग्रहाचे मूल्यमापन शक्य होते. अभ्यासाच्या सोयीसाठी या लेखांचे वर्गीकरण करायचे झाल्यास पहिला गट : वस्तुवाचक विषयांवरील लेख- 'कोहिनूर कोणाचा?', 'मुहूर्तमेढ', 'स्यमंतक मण्याचे आख्यान', 'कालाय तस्मै नमः' या भौतिक वस्तूंच्या माध्यमातून व्यक्त होणारे सामाजिक-सांस्कृतिक विश्व या लेखांमधून स्पष्ट होते. दुसरा गट : इतिहासावरील लेखांचा आहे. यामध्ये 'मराठ्यांच्या इतिहासाची किंमत : एक आणि दोन'; 'शिवछत्रपतींची आधुनिकता', 'आपण आधुनिक झालो?', 'महाराष्ट्रातील युगान्त आणि नवी मुद्रा' 'दोन धक्कादायक शोध' या लेखांचा समावेश होतो. प्रस्तुत लेखसंग्रहाच्या तिसऱ्या गटामध्ये धर्मपर लेखांचा विचार करणे शक्य आहे. या तिसऱ्या गटात 'ईश्वर अल्ला तेरो नाम', 'धर्मांतर का?', धर्मनिरपेक्षतेचे प्रतीक : शाहजादा दारा शुकोह', 'संवाद चतुष्पथीचे गणेश' या लेखांचा एकत्र विचार करावा लागतो. 'उंबरठ्यावर' या लेखसंग्रहातील चौथ्या गटामध्ये भाषा-कला-क्रीडा या सांस्कृतिक विश्वासंबंधीचे विवेचन करणारे लेख : 'विनोद आणि विद्रोह', 'उंबरठ्यावरील लावण्या', 'स्टीफन्स आणि टिळक', 'ज्ञानदीप लावू जगी', 'महाराष्ट्रातील युगान्त आणि नवी मुद्रा' समाविष्ट होतात. याच संग्रहामध्ये काही व्यक्तिपर लेख आहेत. 'बाळशास्त्री जांभेकर', 'भागवतमहाराज देहूकर', 'कॉम्रेड सुभाष जयराम (नाना वैद्य), 'विवेकसाथी दाभोलकर' या व्यक्तींवरील लेखांमधून त्यांनी स्वीकारलेल्या विचारांचे, मूल्यांचे दर्शन घडते. त्यामुळे या लेखांना व्यक्तिविचार दर्शनपर लेख असे म्हणावे लागेल. ही आहे 'उंबरठ्यावर' या लेखसंग्रहाची तोंडओळख.

उंबरठ्यावर

सदानंद मोरे

उंबरठ्यावर
डॉ. सदानंद मोरे
साधना प्रकाशन
पृष्ठे : १६५
मूल्य : १५० रु.

'तुकारामदर्शन', 'लोकमान्य ते महात्मा- दोन खंड', 'गर्जा महाराष्ट्र' अशा समग्र, बृहद् वैचारिक लेखनप्रकारांनंतर डॉ. मोरे छोट्याशा लेखांकडे का वळले आहेत, असा विचार मनात येतो. पण 'मंथन' (१९८३) ते 'उंबरठ्यावर' (२०१५) असा त्यांचा उणापुरा बत्तीस वर्षांचा एकूण लेखनप्रवास पाहिल्यास काही प्रमुख लेखनवैशिष्ट्ये त्यांच्या समग्र लेखनामध्ये दिसतात.

तत्त्वज्ञान, इतिहास, साहित्य यांचा समग्र आणि साकल्याने विचार करून महाराष्ट्राच्या सामाजिक-सांस्कृतिक विश्वाचा शोध घेणे हा त्यांच्या लेखनाचा गाभा आहे. 'मंथन' ते 'उंबरठ्यावर' या सर्वच ग्रंथांचे स्वरूप पाहिल्यास 'एक' सुटा, स्वतंत्र लेख त्या लेखामध्ये मांडलेले एक विचारसूत्र असे त्याचे स्वरूप आहे. परंतु हा एक स्वतंत्र सुटा लेख म्हणजे महत्तम साधारण घटकाचा (म.सा.वि.) लघुतम घटक असतो. प्रत्येक सुट्या लेखसूत्रामधून एक महत्त्वाचे, समग्राचा वेध घेणारे पूर्ण विचारदर्शन त्यामधून उभे राहते. म्हणून त्यांच्या एका छोट्या लेखाचा, लेखसंग्रहाचा आणि बृहद् ग्रंथांचा परस्परांशी जैविक संबंध (organic unity) असल्याचे दिसून येते. घटकराज्यांच्या स्वतंत्र परंतु परस्परांशी जोडलेल्या



अनुक्रमणिका



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद



**ज्येष्ठ अभ्यासक-संशोधक-लेखक डॉ. सदानंद मोरे यांचा 'उंबरठ्यावर' हा वैचारिक लेखसंग्रह अलीकडेच साधना प्रकाशनाच्या वतीने प्रकाशित झाला आहे. या ग्रंथाचा परामर्श घेणारा नव्या पिढीच्या अभ्यासक-समीक्षक प्रा. रूपाली शिंदे यांचा लेख.**



सीमारेषांमधून संपूर्ण देशाचे अखंड चित्र नकाशामध्ये दर्शविले जाते, तसेच डॉ. मोरे यांच्या सर्व ग्रंथांच्या लेखनाच्या मुळाशी असलेला महत्त्वाचा विचार म्हणजे परंपरेच्या पलीकडे जाऊनही परंपरेशी अविरोधी राहणाऱ्या आधुनिकतेचा स्वीकार करणाऱ्या महाराष्ट्राचे सामाजिक-राजकीय-सांस्कृतिक विचारविश्व स्पष्ट करणे याची सुरुवात 'त्रयोदशी'मधील 'ज्ञानदेवांची गीतासंगती' या लेखामध्ये दिसून येते.

'व्यासांनी कृष्णार्जुनसंवाद सातशे श्लोकांत आणला, हा त्यांचा विश्वावर 'थोरू उपकारू झाला' हे ऋण ज्ञानदेव निःसंकोचपणे आणि कृतज्ञतेने नमूद करतात. पण त्याचबरोबर त्यांनी असेही सूचित केले आहे, की या आटणीच्या प्रक्रियेत काही दुवे हरवले असण्याची शक्यता आहे. हे सुटलेले दुवे ते संजयाच्या आधाराने किंबहुना संजयाकरवी जोडून दाखवतात. त्यामुळे ते व्यासांच्या पलीकडे जाऊनही व्यासांशी अविरोधी राहू शकतात (पृ. ११-'त्रयोदशी'). याच विधानाचा धागा घेऊन 'उंबरठ्यावर' या लेखसंग्रहातील विधानाकडे जाणे उचित होईल. 'परंपरा ही एक बाब आहे तर आधुनिकता दुसरी. परंपरेत रमणाऱ्याला आधुनिकता समजून घेणे अवघड जाते, तर आधुनिकाला परंपरेत महत्त्वाचे काही असेल असे वाटतच नाही. परंपरा आणि आधुनिकता यांच्यामध्ये म्हणजेच उंबरठ्यावर उभे राहून दोन्हीकडे समदृष्टीने पाहणाऱ्या व्यक्तीला दोन्ही गोष्टी समजून घेता येतात. त्यांच्यातील ग्राह्यांश तेवढा ठेवून अनावश्यक बाबी टाकून देता येतात. भारतासारख्या प्रदीर्घ इतिहासाचा वारसा लाभणाऱ्या देशासाठी असे उंबरठ्यावरून पाहणे उपयुक्त ठरेल अशी माझी धारणा आहे' (लेखकाचे मनोगत). महाभारत-भगवद्गीता-ज्ञानेश्वरी असे परंपरेतून आलेले परंतु परंपरेशी नाते सांगत परंपरेला ओलांडणारे 'संजय' हे प्रतीक आणि परंपरा व आधुनिकता यांचा समतोल साधणारे उंबरठ्याचे प्रतीक यांच्यात जैविक नाते असल्याचे दिसते. याच क्रमाने पुढे गेल्यास तुकोबांचे प्रतीक, तसेच लोकमान्य टिळक आणि म. गांधी या दोन महाप्रतीकांच्या घडणीतील वैचारिक - सांस्कृतिक प्रतीकात्मकता शोध आणि त्यांची नवनिर्मिती डॉ. सदानंद मोरे करीत आहेत. या प्रतीकनिर्मितीचा प्रवास आता महाराष्ट्रदर्शनपाशी आलेला आहे.

ज्येष्ठ समीक्षक सुधीर रसाळ यांनी 'कविता आणि प्रतिमा' (मौज प्रका., मुंबई, १९८२) या ग्रंथामध्ये विलबर अरबान यांनी केलेल्या प्रतीकांचे वर्गीकरण दिलेले आहे ते इथे उद्धृत केले पाहिजे. १) बाह्य प्रतीक- हे केवळ संलग्नतेच्या नियमामधून घडते. उदा. राजदंड. २) आंतरप्रतीक- दोन वस्तूंकडे एकाच भूमिकेतून पाहिल्यामुळे आंतरप्रतीके जन्मतात. उदा. भरलेला कुंभ हे संपन्नतेचे प्रतीक. ३) मर्मदर्शी प्रतीक- ही मुळात आंतरप्रतीकेच असतात. ती मानवी जीवनात अधिक खोल गेलेली असतात. मानवी जीवनाबद्दल, विश्वाबद्दल ती एक दृष्टी देतात. अतिशय मर्यादित व सर्वपरिचित क्षेत्रातून प्रतीकवस्तू निवडून आणि त्यांना वैश्विक अर्थ देऊन ही प्रतीके घडविली जातात. उदा. 'प्रकाश' हे ज्ञानाचे, काळोख अज्ञानाचे प्रतीक. या साऱ्या विवेचनानंतर डॉ. मोरे 'मंथन' (१९८३) ते 'उंबरठ्यावर' (२०१५) या वैचारिक लेखनाच्या माध्यमातून मर्मदर्शी प्रतीकनिर्मितीची 'महाराष्ट्री' सांस्कृतिक-वैचारिक रीत-पद्धत शोधत आहेत. या शोधप्रक्रियेचा अभ्यास करणे हे अभ्यासकांसमोरचे आव्हान आहे. ●

**प्रा. रूपाली शिंदे**
चलभाष : ९९२१०४७४६१



अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

महाराष्ट्र साहित्य परिषद



प्रकाशक आणि त्यांचे प्रकल्प

सुजाता शेणई









# "पुस्तके सवलतीवर नव्हे, तर



**वाचक आणि प्रकाशक यांचं नातं अतूट असतं. वाचनसंस्कृती वाढवण्याची आणि ग्रंथप्रसाराची मोठी जबाबदारी साहित्य व्यवहारातल्या या दोन महत्त्वाच्या घटकांवर अवलंबून असते. अनेक प्रकाशक चांगल्या व गांभीर्याने वाचन करणाऱ्या वाचकांसाठी अनेक प्रकल्प हाती घेऊन साहित्याचं दालन समृद्ध करत असतात. अशाच काही मराठी प्रकाशन संस्थांचा आणि त्यांच्या विविध प्रकल्पांचा परिचय 'प्रकाशक आणि त्यांचे प्रकल्प' या सदरातून देत आहोत. या अंकात 'डायमंड प्रकाशना'च्या प्रवासाविषयी, भूमिकेविषयी तसेच त्यांच्या विविध प्रकल्पांविषयी दत्तात्रेय पाष्टे यांच्याशी साधलेला संवाद.**



दिवस गुढीपाडव्याचा, चैत्र शुक्ल प्रतिपदेचा. ब्रह्मपुराणानुसार ब्रह्मदेवाने चैत्र शुद्ध प्रतिपदेच्या दिवशी सूर्योदयाच्या वेळी सृष्टी निर्माण केली आणि कालगणनेला प्रारंभ केला. साडेतीन मुहूर्तांपैकी हा एक सर्वोत्तम मुहूर्त म्हणून आपल्या संस्कृतीमध्येही याला विशेष मानाचं स्थान आहे. या मुहूर्तावर एक मध्यमयीन गृहस्थ 'डायमंड पब्लिकेशन्स'चं दुकान शोधत आले. दुकान सापडल्यावर चेहऱ्यावर गुढी उभारल्याचा आनंद दिसून आला. या गृहस्थांनी डायमंड पब्लिकेशन्सच्या प्रकाशकांना, दत्तात्रेय पाष्टे यांना सांगितलं, ''आज पाडव्याच्या दिवशी तुमच्या डायमंड सामाजिक ज्ञानकोश- खंड १, २, ३ ची खरेदी करण्यासाठी आलो आहे. ज्ञानाची गुढी उभारायची, हा या वर्षाचा संकल्प आहे.'' जिज्ञासू वाचकांना असे उत्तमोत्तम, संदर्भपूर्ण आणि अभ्यासपूर्ण ग्रंथ उपलब्ध करून देणारे, कोशवाङ्मय आणि डायमंड पब्लिकेशन्स हे समीकरण अल्पावधीत वाचकांच्या मनात घट्ट करून देणारे प्रकाशक दत्तात्रेय पाष्टे यांच्याशी संवाद साधण्याची संधी मिळाली आणि विविध विषयांवर चर्चाही झाली.

- **डायमंड पब्लिकेशन्सची सुरुवात कशी झाली?**

पुस्तक हा माझा अगदी जिव्हाळ्याचा विषय असल्यामुळे आणि सुरुवातीला लाभलेल्या प्रतिकूल परिस्थितीमुळे मी राका बुक डेपोत नोकरी करीत होतो. या नोकरीचा फायदा असा झाला, की अनेक प्रकाशकांच्या, विक्रेत्यांच्या ओळखी झाल्या. ग्रंथव्यवहार म्हणजे नक्की काय, ग्रंथव्यवहाराचा आत्मा कशात असतो हे लक्षात येऊ लागलं. पुढे थोडंसं अधिक धाडस करून नारायण पेठेतल्या जाधव वाड्यातल्या खोलीला लागून ६ बाय ६ ची शेड भाड्याने घेतली आणि 'डायमंड बुक



अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद




# गुणवत्तेवर उचलली जावीत'' दत्तात्रेय पाष्टे

डेपो' हा पुस्तकविक्रीचा व्यवसाय सुरू केला. विक्रीच्या माध्यमातून महाराष्ट्रभर फिरलो. अनेक प्रदर्शनं भरविली. लोकसंपर्क वाढत गेला. विद्यार्थी, लेखक, प्राध्यापक, वाचक यांना नक्की कशाची गरज आहे याचा धांडोळा घेत गेलो. पुस्तकविक्रीत आमचा भर कला शाखेच्या समाजशास्त्र, मानसशास्त्र, इतिहास, साहित्य, अर्थशास्त्र इ. विषयांवर होता. देश-विदेशांतील इंग्रजी प्रकाशकांचे शैक्षणिक संदर्भग्रंथ आणि कोशवाङ्मय यांचाही समावेश त्यात होता. या विक्रीच्या माध्यमातून इंग्रजीतील विपुल संदर्भग्रंथांची माहिती झाली आणि राष्ट्रीय, आंतरराष्ट्रीय पातळीवर यावर बरंच काम झालंय असं लक्षात आलं. या पार्श्वभूमीवर महाराष्ट्रातले शिक्षक-विद्यार्थी जेव्हा संदर्भग्रंथांची आणि कोशवाङ्मयाची मागणी करायचे, तेव्हा ते उपलब्ध नाही म्हणून नाइलाजास्तव इंग्रजी साहित्याची खरेदी त्यांच्याकडून व्हायची. हे पाहिल्यावर ठरवलं, हे काम स्वतःच हाती घ्यायचं. निश्चय पक्का झाला आणि २००५ मध्ये 'डायमंड पब्लिकेशन्स'ची सुरुवात झाली.

• **२००५, म्हणजे नुकतीच दहा वर्षं झाली आहेत. तरीही अल्पावधीत स्वतःची नाममुद्रा उमटविण्यात आपण यशस्वी झाला आहात. याबद्दल काय सांगाल?**

सुरुवातीपासूनच वैशिष्ट्यपूर्ण आणि नावीन्यपूर्ण पुस्तकं प्रकाशित करण्याकडे लक्ष दिलं. उदा. चार खंडांचा 'भारतीय सरिताकोश', तीन खंडांचा 'सामाजिक ज्ञानकोश', 'शब्दानंद' हा त्रैभाषिक शब्दकोश, पाच खंडांतून प्रकाशित झालेला 'वाणिज्य कोश'; याशिवाय संदर्भग्रंथ, संज्ञाकोश, वैज्ञानिक कोश, ज्ञानकोश यांची निर्मिती केली. 'इंडियन कौन्सिल ऑफ





अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

दत्तात्रेय पाष्टे
चलभाष : ९८८१४७३४१६
info@diamondbookspune.com
www.diamondbookspune.com





**कोशनिर्मिती ही एकूण खर्चिकच आहे. लेखन-संपादन यात बराच कालावधी जातो. पृष्ठसंख्या मोठी, मुद्रणखर्चही मोठा, त्यामुळे गुंतवणूकही मोठ्या प्रमाणावर करावी लागते. पण एकदा कोशवाङ्मय निर्मिती करायची हे ठरवल्यावर मागणीचा सखोल अभ्यास केला, संभाव्य विक्रीचा अंदाज बांधला आणि कामाला सुरुवात केली. आनंदाची बाब म्हणजे आमच्या बहुतेक कोशांच्या पहिल्या आवृत्त्या संपून त्यांची पुनर्मुद्रणं झाली.**



हिस्टॉरिकल रिसर्च' या प्रख्यात संस्थेबरोबर करार करून डी. डी. कोसंबी, जदुनाथ सरकार, हेमंत रायचौधरी यांसारख्या दिग्गज इतिहासकारांची गाजलेली पुस्तकं प्रथमच मराठीत आणली. 'सेज' या आंतरराष्ट्रीय प्रकाशनसंस्थेबरोबर करार करून सामाजिक शास्त्रातील अनेक महत्त्वाची पुस्तकं पहिल्यांदा डायमंड पब्लिकेशन्सने प्रकाशित केली. या सगळ्यामुळे वाचक, अभ्यासक, समीक्षक, संशोधक, लेखक सगळ्यांनी डायमंडची दखल आवर्जून घेतली. प्रकाशन व्यवसायात निर्मितीबरोबर वितरणालाही खूप महत्त्व आहे. पुस्तक कितीही चांगलं असलं तरीही जर ते लोकांसमोर आलंच नाही तर विक्री आणि प्रसार कसा होणार? म्हणून वितरण व्यवस्थेवरही सुरुवातीपासून भर दिला. आता वाचक आमच्यापर्यंत आपणहून पोचत आहेत ही समाधानाची बाब आहे.

- **कोशवाङ्मयाची निर्मिती ही वेळ आणि खर्च दोन्ही घेणारी आहे, तरी आपण सातत्याने याचीच निर्मिती करीत आहात, हे का?**

कला शाखेचे विद्यार्थी हे पदवी आणि पदव्युत्तर शिक्षण मोठ्या प्रमाणातून मराठीतून घेताना दिसतात. रत्नागिरी, सोलापूर, सांगली, धुळे यांसारख्या निमशहरी आणि ग्रामीण भागातून शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या मोठी आहे. या विद्यार्थ्यांना संदर्भग्रंथ, कोश मराठीतून उपलब्ध नव्हते. ही मोठी अडचण लक्षात आल्यावर त्यात व्यावसायिक संधी शोधली आणि कोशवाङ्मय निर्मितीला सुरुवात झाली.

कोशनिर्मिती ही एकूण खर्चिकच आहे. लेखन-संपादन यात बराच कालावधी जातो. पृष्ठसंख्या मोठी, मुद्रणखर्चही मोठा, त्यामुळे गुंतवणूकही मोठ्या प्रमाणावर करावी लागते. पण एकदा कोशवाङ्मय निर्मिती करायची हे ठरवल्यावर मागणीचा सखोल अभ्यास केला, संभाव्य विक्रीचा अंदाज बांधला आणि कामाला सुरुवात केली. आनंदाची बाब म्हणजे आमच्या बहुतेक कोशांच्या पहिल्या आवृत्त्या संपून त्यांची पुनर्मुद्रणं झाली. गुंतवणुकीचा योग्य परतावा मिळाला. प्रोत्साहन तर शब्दातीत म्हणावं लागेल. विशेष उल्लेखनीय बाब म्हणजे कोशांच्या किमती अधिक असूनही वैयक्तिक ग्राहक त्याला मिळतो आहे. संस्थात्मक पातळीवर तर मागणी असतेच.

- **कोशासाठी विषय आणि लेखक यांची निवड कशी करता ?**

सुरुवातीपासून कला शाखेतील सामाजिक शास्त्रांवर आमचा भर होता आणि आहे. महाराष्ट्रातील विविध महाविद्यालयं आणि विद्यापीठं यांच्याशी जवळून संपर्क आल्यामुळे त्या त्या क्षेत्रातील तज्ज्ञ प्राध्यापकांशी चर्चा केली. या उपक्रमाबद्दलची निकड त्यांच्या निदर्शनास आणून दिली. अनुभव तर असा आला की काही तज्ज्ञांनी या संदर्भात लेखन केलं होतं, पण प्रकाशक गुंतवणूक करायला तयार नसल्याने ते अप्रकाशित राहिलं होतं. यासाठी आमच्या प्रकाशनसंस्थेने पुढाकार घेतला आणि कोशनिर्मिती झाली. उदा. प्रा. डॉ. बी. आर. जोशी यांचे संज्ञाकोश-मानसशास्त्र, संज्ञाकोश- राज्यशास्त्र, संज्ञाकोश- शिक्षणशास्त्र इ. याबरोबरच काही जुने कोश बाजारात मिळत नव्हते परंतु अभ्यासकांना त्यांची गरज होती असे कोश पुनर्प्रकाशित केले. उदा. य. न. केळकर यांचा 'ऐतिहासिक शब्दकोश'. याशिवाय प्राचार्य शशिकांत कर्डेकर यांचा 'जागतिक विज्ञानकोश', डॉ. श्रीकांत कार्लेकर व प्रा. जॉन्सन बोर्जेस यांचा 'भूगोल-पर्यावरणशास्त्र कोश', डॉ. एम. बी. कोण्णूर, सुजाता कोण्णूर व श्रीमती माणगावकर यांचा 'ग्रंथालय व माहितीशास्त्रकोश' हे व यांसारखे अनेक कोश आज बाजारात उपलब्ध आहेत.

- **कोशवाङ्मयासह आपण अन्य वाङ्मय-प्रकारांतही निर्मिती केली आहे. त्यामागे आपली भूमिका काय असते?**

कोशवाङ्मयाचा वाचक हा अभ्यासक असतो, पण सामान्य वाचकाचीही काही मागणी असतेच. यासाठी आम्ही



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

कुमार वाङ्मयाची निर्मिती करीत आहोत. 'भन्नाट माणसं' ही प्रेरक कथारूप चरित्रमालिका प्रकाशित करीत आहोत, ज्यात 'अमिलिया एअरहार्ट', 'अब्राहम लिंकन', 'श्रीनिवास रामानुजन', 'थॉमस एडिसन' इ. चरित्रं प्रकाशित केली आहेत. 'कोरलाईन' (मूळ लेखक : नील गेमन, अनुवाद : नीलेश पाष्टे), 'द हॉबिट' (मूळ लेखक : जे. आर. टॉल्किन, अनुवाद : मीना किणीकर) या जगप्रसिद्ध कादंबऱ्यांचे अनुवाद प्रकाशित केले आहेत. याशिवाय इतिहास, जागतिक घडामोडी, विज्ञान-तंत्रज्ञान या विषयांवर जगभरात गाजलेल्या निवडक पुस्तकांचे अनुवाद मराठीत आणले आहेत. या पुस्तकांना भरघोस प्रतिसाद असल्याने त्यांची निर्मिती पुढे चालू राहणार आहे.

• **'जेरुसलेम द बायोग्राफी' (मूळ लेखक सायमन सीबग मांटफिऑरी, अनुवाद सविता दामले), हे तुम्ही प्रसिद्ध केलेले पुस्तक सध्या खूप गाजत आहे. काय मत आहे याबद्दल?**

ज्यू धर्म, ख्रिश्चन धर्म आणि इस्लाम धर्म या तीन महान एकेश्वरवादी धर्मांचा इतिहास सांगणारं आणि तीन हजार वर्षांचा विशाल कालपट असणारं हे एक महत्त्वाचं पुस्तक आहे. जगाच्या इतिहासाची सांगड घालायची असेल तर या धर्मांचा इतिहास समजून घेणं खूप महत्त्वाचं आहे. आज या क्षणालाही मध्यपूर्वेत युद्ध पेटलंय. आयसिससारख्या धर्मीय संघटना बोकाळलेल्या आहेत. अमेरिका, रशिया, युरोपीय देश आणि अरब देश या संघर्षात सामील आहेत. हे सगळं समजून घ्यायचं असेल तर जेरुसलेम शहराचा आणि त्या अनुषंगाने जगाचा इतिहास समजून घ्यावा लागेल. अभ्यासू, संशोधनात्मक पुस्तकही लेखकाच्या शैलीमुळे किती वाचनीय ठरू शकतं याचं हे उत्तम उदाहरण आहे. मराठी वाचकांमध्ये जागतिक घडामोंडीबद्दल कमालीची उत्सुकता आहे, जिज्ञासा आहे. ती गरज हे पुस्तक काही प्रमाणात पूर्ण करतं आणि म्हणूनच त्याला उदंड प्रतिसाद मिळतो आहे. ओसामा बिन लादेनच्या दहा वर्षांच्या शोधमोहिमेचं प्रत्ययकारी आणि वास्तवदर्शी चित्रण करणारं 'मॅनहंट' हे पुस्तकही बेस्टसेलर ठरलं आहे.

**तंत्रज्ञानाच्या या क्षेत्रावर होणाऱ्या परिणामाबद्दल आणि एकूण या प्रकाशन व्यवसायाबद्दल काय म्हणू इच्छिता?**

तंत्रज्ञानाचा पुस्तक व्यवहारावर मूलभूत परिणाम व्हायला सुरुवात झाली आहे. छापील पुस्तकांची ऑनलाइन विक्री दिवसेंदिवस वाढत आहे. कदाचित काही वर्षांनी एकूण पुस्तकविक्रीचा मोठा वाटा ऑनलाइनचा असेल. वितरणासाठी सोशल मीडिया अत्यावश्यक ठरत चाललंय. पुस्तकांच्या उपलब्धतेचा प्रश्न कायमचा सोडवण्याची क्षमता ई-बुकमध्ये आहे. एखादं पुस्तक जगभरात कुठेही काही क्षणांत उपलब्ध होऊ शकतं. आवृत्ती संपली आहे, स्टॉक नाही, हे प्रश्न सुटत असतील तर वाचकांसाठी आणि विशेषतः तरुण पिढीसाठी हे आशादायी चित्र आहे. एकविसाव्या शतकात तंत्रज्ञान झपाट्याने वाढल्याने 'सॉफ्ट कॉपी' आपण म्हणू लागलो, पण व्यक्तिशः मला 'हार्ड कॉपी' जेवढा आनंद देते तेवढा 'सॉफ्ट कॉपी' देत आहे.

प्रकाशन व्यवसायात प्रकाशक आणि वाचक यांचं नातं दृढ असतं. वाचकांनी पुस्तकखरेदी ही 'डिस्काउंट' किंवा 'कमिशन' यावर न करता गुणवत्तेवर करावी. सार्वजनिक वाचनालयातही चांगल्या प्रकाशकांची चांगली पुस्तकं (डिस्काउंट विचारत न घेता) उपलब्ध व्हायला हवीत. त्यामुळे वाचनसंस्कृती वाढणार आहे आणि टिकणार आहे. वाचक, वाचनसंस्कृती आणि प्रकाशक हातात हात घालून पुढे जायला हवेत.

• **महाराष्ट्र राज्याच्या सुवर्णमहोत्सवानिमित्त 'डायमंड पब्लिकेशन्स'ने एकावन्न पुस्तकं प्रकाशित करून एक मोठा उपक्रम केला होताच. आता यापुढील प्रकल्प कोणते?**

'दहशतवाद' आणि 'मानवी हक्क व सामाजिक न्याय' या विषयांवरील कोशनिर्मितीचं काम प्राथमिक टप्प्यावर आलं आहे. याशिवाय समाजशास्त्र, राज्यशास्त्र, इतिहास या विषयांवरील महाराष्ट्रातील आघाडीच्या संशोधकांनी लिहिलेल्या अभ्यासपूर्ण संदर्भग्रंथाचं काम अखेरच्या टप्प्यावर आहे. बांगला देशच्या मुक्तिसंग्रामावर नवा प्रकाश पाडणाऱ्या 'ब्लड टेलिग्राम' या पुलित्झर पुरस्कारासाठी नामांकित झालेल्या पुस्तकाचा आणि 'सेपियन्स : मानवजातीचा संक्षिप्त इतिहास' या जगभरात गाजत असलेल्या पुस्तकाचा मराठी अनुवाद लवकरच प्रकाशित होतोय.

एकूणच, 'डायमंड पब्लिकेशन्स'ने आपली ओळख प्रकाशन व्यवसायात निर्माण केली आहे यात शंका नाही. या प्रकाशनाला 'द फेडरेशन ऑफ इंडियन पब्लिशर्स', 'अखिल भारतीय मराठी प्रकाशक संघाचा उत्कृष्ट ग्रंथनिर्मिती पुरस्कार', 'महाराष्ट्र साहित्य परिषदेचे मानाचे पुरस्कार आणि इतर अनेक पुरस्कार प्राप्त झाले आहेत. गुणवत्तेची कास धरणाऱ्या दत्तात्रेय पाष्टे यांची 'डायमण्ड बुक डेपो', 'डायमण्ड बुक सेंटर, आणि 'डायमण्ड पब्लिकेशन्स ही तीन रूपं दिमाखात उभी आहेत.

●

**प्रा. सुजाता शेणई**
९०११०१७९१६
sujata.shenai@gmail.com



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद



विशेष लेख

नागनाथ बळते

# सांस्कृतिक पुनर्संदर्भीकरणाची प्रक्रिया आणि आंधळ्यांची शाळा

**एखादी साहित्यकृती स्रोत भाषेतून लक्ष्यभाषेत रुपांतरित होत असताना तिचे संदर्भ बदलतात. ब्यर्नसनच्या A Gauntlet (आव्हान) या नाटकाच्या विषयावर श्री. वि. वर्तक यांनी लिहिलेले 'आंधळ्याची शाळा' हे नाटक मूळ नाटकातील आधुनिकता संकुचित करणारे कसे आहे, याचे अभ्यासपूर्ण विवेचन करणारा लेख.**



मराठी नाटकामधील आधुनिकता गतिमान करण्यामध्ये भारतीय आणि पाश्चात्त्य भाषांमधील भाषांतरित अथवा रूपांतरित नाटकांचे योगदान महत्त्वाचे आहे.

मराठी नाटकांना प्रभावित करणारी आधुनिकता ही या नॉर्वेजियन नाटककाराच्या संस्कारातून निर्माण झाली. आधुनिक नागर जीवनातील समस्या प्रथमच अधोरेखित झाल्या. पौराणिक, ऐतिहासिक आणि संगीत नाटकाची जागा समस्याप्रधान नाटकांनी घेतली. आधुनिक जीवनातील कुटुंब आणि घराचे विघटन होऊ लागल्याने त्याचे क्षीण का होईना सामाजिक भान नाटकात उमटू लागले. इब्सेनने प्रवर्तित केलेल्या जीवनजाणिवांना रंगभूमीवर आणण्यासाठी नाट्यमन्वंतरची स्थापना झाली. या संस्थेने आधुनिकतेच्या दृष्टीचे रंगभूमीवर टाकलेले पहिले पाऊल म्हणजे आंधळ्यांची शाळा हे होय, असे म्हटले जाते. (मराठीतील बऱ्याच अभ्यासकांचे असे मत आहे.) 'आंधळ्यांची शाळा'बरोबरच कुलवधू, तक्षशिला इ. नाटकांचेही प्रयोग नाट्यमन्वंतरने केले. आंधळ्यांची शाळा हे नाटक पहिले आणि अधिक महत्त्वाचे असल्यामुळे या नाटकाचा आपण सांस्कृतिक पुनर्संदर्भीकरण प्रक्रियेच्या दृष्टीने विचार करू.

वि. सि. सरवटे त्यांच्या मराठी साहित्य समालोचन या अभ्यासपूर्ण ग्रंथात वर्तकांविषयी पुढील उद्‌गार काढतात : 'ज्या आधुनिक नाटककारांनी मराठी नाटकाच्या रचनेत नवीन तंत्र सुरू करून महाराष्ट्र नाट्यसृष्टीत मन्वंतर घडवून आणले आहे त्यात वर्तक यांची प्रामुख्याने गणना होते. त्यांच्या 'लपंडाव' (१९३३) व 'आंधळ्यांची शाळा' (१९३३) या दोन्ही नाटकांत संविधानक फार लहान, दुय्यम महत्त्वाचे असून मुख्य कटाक्ष स्वभावदर्शनावर आहे... त्यांच्या 'आंधळ्याच्या शाळे'त विचारक्षोभ करण्याचे सामर्थ्य व स्वभावपरिपोष अधिक आहे. या नाटकातील वातावरण विसाव्या शतकातले, सुशिक्षित, श्रीमंत, पाश्चात्त्य धर्तीचे आहे. पाश्चात्त्य समाजाप्रमाणे त्यातील स्त्रीपुरुष एकमेकांशी अगदी मोकळेपणाने वागतात.' असे हे नाटक आणि नाटककार आहेत, ज्यांनी मोठे मन्वंतर नाट्यसृष्टीत







मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


महाराष्ट्र साहित्य परिषद


अनुक्रमणिका

केले असे त्यांना वाटते. पुढे या नाटकाविषयी सरवटे असे म्हणतात, की 'जग ही एक मोठी थोरली आंधळ्यांची शाळा आहे. त्या शाळेत प्रत्येकाला स्वतःचे अंतःकरण दिसत नाही व पाहताही येत नाही, पण दुसऱ्यानेही ते पाहू नये म्हणून त्याला तो आंधळा बनविण्याचा प्रयत्न करीत असतो. अशा या शाळेत आपण दुसऱ्यावर व तो आपणावर प्रेम करू लागण्यापूर्वी त्याचे पूर्वचरित्र कसे होते हे पाहण्याचा प्रत्येकाला किती हक्क व योग्यता आहे हा प्रश्न आहे. तो हे नाटक पाहून प्रत्येकाने सोडवावा.'[१] सरवटे यांचे मत ग्राह्य धरून अनेकांनी पुढे रंगभूमीच्या इतिहासाची मांडणी करीत असताना एकंदरीने आंधळ्यांची शाळा हे महत्त्वाचे नाटक आहे असे सुचविलेले दिसते. या मताची पुनर्तपासणी येथे करावयाची आहे. सरवटे म्हणतात त्याप्रमाणे ह्या नाटकातील वातावरण सुशिक्षित, पाश्चात्त्य धर्तीचे असले तरी हे नाटक प्रक्षोभक आशयाची मांडणी करीत नाही तर प्रक्षोभाची धार बोथट करते. हे समजून घेण्यासाठी वर्तकांनी हे नाटक ज्या नाटकावरून घेतले त्याचा विचार करू.

एकोणिसाव्या शतकाचा उत्तरार्ध हा नॉर्वेजियन नाट्यकलेच्या उत्कर्षाचा काळ होता. या काळात इब्सेन आणि ब्यर्नसन यांनी नॉर्वेजियन लोकांच्या स्वाभिमानी आणि बाणेदारपणाची ओळख वाचकाला करून दिली. त्यांची नाटके म्हणजे पाश्चिमात्य संस्कृतीच्या उंच भरारीची ओळखच होती. ब्यर्नसनने आव्हान (A Gauntlet) हे नाटक १८८३ मध्ये लिहिले. सर्वसामान्यांच्या समजुतीवर हल्ला चढवणाऱ्या त्याच्या इतर नाटकांप्रमाणेच याही नाटकाने पाश्चात्त्य रंगभूमीवर खळबळ उडवून दिली. या नाटकासंदर्भात असे बोलले जाते, की जर्मनीतील हॅम्बर्ग या शहरात (१८८३) जेव्हा या नाटकाचा पहिला प्रयोग झाला तेव्हा पूर्वी ठरलेल्या बऱ्याच मुलींची लग्ने मोडली होती.[२] कारण आव्हान या नाटकातील विषय म्हणजे समाजाला दिलेले आव्हानच होते. पुरुष स्त्रियांकडून पावित्र्याची अपेक्षा करतात. स्त्रियांचे विवाहापूर्वीचे चारित्र्य कलंकित असेल तर त्यांच्याशी विवाह करण्यास नकार देतात. त्याचप्रमाणे स्त्रियांनीही पुरुषांकडून पावित्र्याची, निष्कलंक चारित्र्याची अपेक्षा का करू नये, हा प्रश्न या नाटकाच्या मुळाशी आहे. आपल्या प्रियकराचे कलंकित चारित्र्य कळल्यानंतर त्या प्रियकराशी विवाहबद्ध न होण्याचा निर्णय मुलीने घेणे योग्य होईल, या प्रश्नाला ब्यर्नसनने हात घातला. जगात स्त्रियांवर होणाऱ्या अन्यायापैकी स्त्रियांच्या चारित्र्यविषयक एकांगी कल्पनेला या नाटकामुळे वाचा फुटली. समाजात वैवाहिक नीतीचा नियम पुरुषांकरिता एक आणि स्त्रियांकरिता दुसरा, ही जी विषमता आढळून येते ती या नाटकाने लोकांपुढे मांडली. त्यामुळे युरोपातही मोठी खळबळ माजली. हा ब्यर्नसनला जो विषय आवडला तोच विषय वर्तकांनाही आवडला. त्या विषयावर त्यांनी आंधळ्यांची शाळा हे नाटक लिहिले. परंतु वर्तकांनी या नाटकाचे भाषांतर केले नसून फक्त विषयाचीच उसनवारी केली. नाटकातील विषयाच्या निष्कर्षाबाबत ते नाटकाच्या कर्त्याशी सहमत होऊ शकले नाहीत. या संदर्भात त्यांचेच मत पाहण्यासारखे आहे.

या नाटकाचा पहिला प्रयोग १ जुलै १९३३ रोजी झाला. या पहिल्या प्रयोगाच्या दिवशी वर्तकांनी जे निवेदन लिहिलेले होते (नाटकाच्या दुसऱ्या आवृत्तीला पहिल्या आवृत्तीचे निवेदन जोडलेले आहे.) त्यात वर्तक असे म्हणतात, की '१९२४ साली प्रसिद्ध स्कॅन्डिनेव्हियन नाटककार ब्यर्नसन (Bjornson) याचें गॉन्टलेट हे नाटक माझ्या वाचनात आले. ग्रंथकाराने निवडलेला विषय मला कमालीचा आवडला; परंतु एकंदर मांडणी, विचारसरणी व त्याने काढलेला निष्कर्ष ही मला तितकीशी आवडली नाहीत व काही काही ठिकाणी तर माझा त्या श्रेष्ठांशी तीव्र मतभेदही होऊ लागला. अशा मनःस्थितीत असताना माझ्या मनात तोच विषय घेऊन त्याचे स्वतंत्र प्रतिपादन करावे अशी इच्छा गेली आठ-नऊ वर्षे एकसारखी खेळत राहिली आणि त्या इच्छेचे मूर्त स्वरूप म्हणजेच प्रस्तुतचे नाटक होय.'[३] लेखकाचे भाषांतरकाराशी मतभेद का झाले? स्त्रीपुरुष समानता हे तत्त्व भाषांतरकाराला मान्य नव्हते का? हे समजून घेण्यासाठी आणि भाषांतरित कलाकृतीची झालेली वाटचाल अभ्यासण्यासाठी दोन्ही नाटकांच्या आशयाचा विचार करू.

आव्हान या नाटकाचे कथानक साधे आहे. दोन संपन्न कुटुंबांतील तरुण-तरुणीचा विवाह निश्चित होतो; परंतु या विवाहनिश्चितीनंतर दुसऱ्याच दिवशी एक तरुण नायिकेला भेटायला घरी येतो आणि तिला प्रियकराच्या कलंकित पूर्वचारित्र्याची माहिती देतो. त्या क्षणी तिचा प्रियकरही तिला भेटायला येतो आणि त्या दोघांची तिच्यासमोर भेट होते. त्या वेळचे त्याचे वर्तन पाहून तिचा संशय दृढ होतो आणि ती त्याच्याशी असलेले प्रेमसंबंध तोडून टाकते. येथे या नाटकाचा पहिला अंक संपतो. दुसऱ्या अंकात लोकापवाद टाळण्याकरिता म्हणून विवाह जमवून आणण्यासाठी तिचे भावी सासरे भेटायला येतात. या दोन्ही कुटुंबांशी संबंध असलेले एक डॉक्टर मध्यस्थी करतात. व्यावहारिक अडचणी, स्त्री-पुरुषांचे हक्क या विषयांवर चर्चा होते. नायिकेचा प्रियकर याबद्दल माफी मागत नाही, फक्त भविष्यकाळाविषयी आश्वासन देतो. तेव्हा नायिका आपला हातमोजा काढून मारते. येथे दुसरा अंक संपतो. तिसऱ्या अंकात नायिकेला तिच्या पित्याच्या बदफैली वर्तनाची



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

माहिती मिळते. याविषयी डॉक्टरांच्या तोंडचे उद्‌गार आणि स्वतःच्या आईचे पत्र या बाबी तिची खात्री पक्की करतात. पित्याचे हे नैतिक अधःपतन पाहून तिला शरमल्यासारखे वाटते. आदल्या दिवशीच्या स्वतःच्या वर्तनाबद्दल ती प्रियकराची माफी मागते; परंतु प्रियकराचे प्रेम अढळ असल्यामुळे आता नाही तरी भविष्यात केव्हा तरी प्रेमाची खात्री पटल्यानंतर विवाह करण्याचे मूक आश्वासन द्यावे अशी तो विनंती करतो. ती त्याला मूक आश्वासन देते आणि तिसरा अंक संपतो. नायिका कोणत्याही अर्थाने पुरुषविषयक धारणेला थारा देत नाही. ती खंबीर युक्तिवाद करते. पुरुषांनीही आपले चारित्र्य कलंकित होऊ देऊ नये, असे प्रमेय हे नाटक मांडते.

याउलट, अकलंकित चारित्र्यावर भर देण्यासाठी वर्तक आंधळ्यांची शाळा हे नाटक लिहीत नाहीत. नाटकाचा विषय जरी वर्तकांना आवडला तरी ते या प्रश्नांची मांडणी निराळ्या तऱ्हेने करतात. पुरुषांच्या विवाहपूर्व चारित्र्याचा प्रश्न या नाटकात मध्यवर्ती कल्पना राहत नाही. त्यामुळे या नाटकातील विचारप्रधानता हरवून जाते. नाटक म्हणजे केवळ संसाराचे चित्र अशी प्रतिमा निर्माण होते.

वर्तकांच्या नाटकाचे कथानक पुढीलप्रमाणे : मनोहर व सुशीला या सुखवस्तू जोडप्याची बिंबा ही एकुलती एक मुलगी. बिंबाला प्रांताधिपाचे सचिव अण्णासाहेब यांचा मुलगा शरदकुमार मागणी घालतो; परंतु लग्न ठरवण्याच्या दिवशीच बिंबाला कुमारच्या कलंकित चारित्र्याची माहिती एका गृहस्थाकडून कळते. तो गृहस्थ म्हणजे बिंबाच्या प्रियकराने संबंध ठेवल्यामुळे जी स्त्री झुरून मेली तिचा नवरा असतो. त्यामुळे कुमारशी बिंबा प्रेमसंबंध ठेवू इच्छित नाही. येथे नाटकाचा पहिला अंक संपतो. आव्हान आणि या नाटकाच्या पहिल्या अंकाचा शेवट सारखाच होतो.

दुसऱ्या अंकात आव्हान नाटकातल्या डॉक्टरसारखेच विश्वनाथ हे दोन्ही कुटुंबांशी संबंधित असे गृहस्थ आहेत. ते पेशाने प्रोफेसर आणि तत्त्वज्ञानी असून बिंबाची आणि कुटुंबाची ते समजूत घालण्याचा प्रयत्न करतात व बिंबाचे मन वळवतात, भावी सासऱ्याची भेट घेण्यास तयार करतात. अण्णासाहेब बिंबाने चालवलेल्या आंधळ्यांच्या शाळेला आपण का मदत केली याचाही खुलासा करतात. यातून तिला कसे विकत घेतले हेही सांगतात. सरकारी मदतीशिवाय स्वखर्चातून केलेली पाच हजारांची मदत हे नातेसंबंध टिकावेत म्हणूनच केलेली आहे. संबंध मान्य न केल्यास चेक बँकेतून घेता येणार नाही याची व्यवस्था करू, अशी धमकीही देतात. बिंबा तेव्हा तो चेक त्यांच्या अंगावर फेकून देते आणि निघून जाते. अण्णा तरीही तिचे कौतुकच करतात. अशा स्वतंत्र बाण्याची मुलगी सून म्हणून आपणास हवीच आहे. ती न झाल्यास तिच्या वडिलांनी केलेल्या बदफैली वर्तनाची तिला ओळख करून देईन म्हणजे ती नमेल, अशी धमकी अण्णासाहेब बिंबाच्या आई-वडिलांना देतात. तो पत्नी आणि विश्वनाथाला त्यांची मनधरणी करायला सांगतो. येथे दुसरा अंक संपतो. येथून पुढे आव्हान या मूळ नाटकाशी असलेला या नाटकाचा संबंध तुटतो व कथानकाला वेगळे वळण मिळते. बिंबा जेव्हा चेक फेकून मारते तेव्हा आव्हानमधील नायिका स्वावा ही तिचा प्रियकर आल्फ (Alf) च्या तोंडावर हातमोजा फेकून मारल्याच्या प्रसंगाची आठवण होते. बिंबा सासऱ्याला तर स्वावा प्रियकराला आव्हान देते. यानंतर मात्र नाटकाची वेगळ्या दिशेने वाटचाल सुरू होते.

तिसऱ्या अंकात बिंबाने घरातून घालवून दिल्यानंतर कुमार बाहेर पडला. प्रेमभंगाने दिशाहीन/सैरभैर झाला नाही तर तो घरी आला. त्याचे विवाहित स्त्रीवर प्रेम होते त्यामुळे तो विचारी बनला, देहभान विसरला नाही. बिंबाची आई अण्णासाहेबांना भेटण्यास येते आणि मी बिंबाचे मन वळवेन ,काही दिवसांचा कालावधी द्या, अशी विनंती करते. अण्णासाहेब आणि सुशीला बोलत असताना त्या संभाषणाच्या ओघात विश्वनाथ, मनोहर, अण्णासाहेब आणि सुशीला यांच्या परस्परसंबंधांचा उलगडा प्रेक्षकांना होतो. विश्वनाथ भिडस्त असल्यामुळे त्याने आपले प्रेम बोलून दाखवले नाही, तर अण्णासाहेबांनी एकदाच मागणी घातली म्हणून सुशीलेने ती नाकारली. मनोहरने अत्यंत चिकाटीने सुशीलेला मागणी घातली, त्यामुळे त्यांचा विवाह झाला. परंतु सुशीला तिघांनाही आवडत होती. पण मनोहरच्या नीतिबाह्य वर्तनाने तिच्या आयुष्याचे मातेरे केले. शेवटी आपण ज्या फेऱ्यात सापडलो त्या फेऱ्यात बिंबा सापडू नये म्हणून सुशीला प्रयत्न करते. अण्णासाहेब सुशीलेच्या या घटनेबद्दल आणि मनोहरच्या नीतिबाह्य वर्तनाबद्दल बिंबाला काहीही सांगणार नाही असे वचन देतात. थोडक्यात, अण्णासाहेबांची विधुरावस्था, कुमारचे प्रेमविषयक तत्त्वज्ञान; कॉलेजमधील मनोहर, विश्वनाथ, अण्णासाहेब, सुशीला यांचे परस्पर प्रेमसंबंध याच गोष्टींची भरमसाट चर्चा तिसऱ्या अंकात होते. मनोहरला त्याच्या चारित्र्यहीन वर्तनाचा झालेला पश्चाताप प्रेक्षकांच्या मनात सहानुभूती निर्माण करतो.

चौथ्या अंकात मनोहर आपली सर्व मालमत्ता बिंबाच्या नावावर करून देतो. त्यानंतर सुशीला आणि मनोहर यांच्या संवादात तो आपले सर्व अपराध कबूल करतो आणि बिंबाच्या प्रेमाला पारखे झाल्यास आपल्याला आत्महत्या



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

करावी लागेल असे म्हणतो. या संवादात एकमेकांचे गैरसमज दूर होतात. या दुर्वर्तनाची शिक्षा म्हणून तो घर सोडून जायला निघतो. तोपर्यंत विश्वनाथने वडिलांच्या दुश्चरित्राबद्दल बिंबाला पत्राने कळवलेले असते. ते पत्र वाचून त्याबद्दल आईची खात्री करून घेते. संतापाने हे घर सोडून जाण्यापूर्वी एकदा बिंबा वडिलांना भेटायला येते; परंतु त्यांनी स्वतःच निवडलेल्या गृहत्यागाच्या शिक्षेचा निर्णय पाहून तिचेही मन द्रवते. बाबा आपल्याला सोडून जाणार म्हणून ती त्यांना बिलगते. हे पितापुत्रीच्या पवित्र प्रेमाचे दृश्य पाहून प्रेक्षकांच्याही डोळ्यांत पाणी येते. कुमार आणि बिंबाचेही एकमेकांबद्दलचे गैरसमज संपून मिलन होते. नाटकाचा सुखान्त शेवट होतो.

सांस्कृतिक आशय जेवढा अधिक तेवढ्या प्रमाणात त्या साहित्यकृतीचे भाषांतर अवघड होऊन जाते. मूळची कलाकृती ज्या भाषेत निर्माण होते त्या कलाकृतीचा त्या भाषेतील संस्कृतीशी संबंध असतो. मूळची साहित्यकृती वाचणारा वाचक त्या संस्कृतीचा भाग असतो. त्या साहित्यकृतीतला अनुभवही त्याच संस्कृतीतून आलेला असतो. लेखक, वाचक, आशय-विषय हे एकाच संस्कृतीचे घटक असतात. ही कृती निर्माण करणारी भाषा ही स्रोत भाषा होय. या स्रोत भाषेतून जेव्हा लक्ष्य भाषेत कलाकृती भाषांतरित केली जाते तेव्हा तिचे हे सांस्कृतिक संदर्भ बदलतात. म्हणजे तिचा लेखक, वाचक, विषय-आशय या त्रिविध संबंधाचे स्वरूप बदलते. तिचा देश बदलतो. तिचा काळही बदलतो. एखादी साहित्यकृती जेव्हा भाषांतरित होते तेव्हा त्या भाषेची संस्कृतिविशिष्ट वेगळी घाटणी असते. तिला वेगळा वाचकवर्गही लाभत असतो. 'मूळ साहित्यकृतीची सांस्कृतिक विशिष्टता, त्या कृतीला घेरणारे पर्यावरण/ परिस्थिती, भौतिक दृष्टिकोन, सामाजिक दृष्टिकोन, धार्मिक दृष्टिकोन इ. घटकांनी निर्माण केलेली असते. ही साहित्यकृती लक्ष्य भाषेत नेताना हे सारे घटक कसे संक्रमित करायचे हे भाषांतरकारापुढचे आव्हान असते. भाषांतरप्रक्रियेत विशिष्ट भाषेतल्या साहित्यकृतीतला नुसता अनुभवच संक्रमित होतो असे नसून त्या साहित्यकृतीतल्या सांस्कृतिकतेचे 'पुनर्संदर्भीकरण' (Cultural recontextualisation) केलेले असते. मूळ भाषेतील संहितेने नुसता अर्थच निर्माण केलेला नसतो, तर त्या अर्थाला विशिष्ट संदर्भ दिलेला असतो.'[४] मूळ संहितेत वापरलेले शब्द हे त्या वाचकांची सांस्कृतिक स्मृती जागी करीत असतात. सांस्कृतिक संदर्भ लेखक आणि वाचकांचे एकच असतील तर त्या कलाकृतीच्या वाचनप्रक्रियेत वाचकाचा सहभाग सुलभ होतो. त्या कलाकृतीचे अस्तित्व त्या भाषेतील या संदर्भांनिशी असते. हे संदर्भ संहितांतर्गत आणि संहिताबाह्य असतात. या संदर्भांनीच उपलब्ध करून दिलेले मानदंड वाचकसुद्धा कलाकृतीच्या मूल्यमापनासाठी वापरतो. थोडक्यात, वाचक आणि लेखक एकाच सांस्कृतिक आणि वाङ्मयीन परंपरेतले असल्यामुळे लेखनात आणि आस्वादात जे संस्कृतिविशिष्ट राजकारण, सत्ताकारण आणि मूल्यनिर्धारण असते त्याचा परस्परांत सहज उलगडा होतो.

भाषांतरित साहित्यकृती जेव्हा भिन्न किंवा परस्थ वाचकाला सामोरी जाते त्या वेळी वेगळी प्रक्रिया घडते. म्हणजे तिची मूळ भूमी बदलून ती एक सुटी कलाकृती म्हणून वाचकाला सामोरी जाते. अशा वेळी भाषांतरकर्त्याला त्या कलाकृतीत वाचकाचा सहभाग निर्माण होण्यासाठी साहित्यकृतीतील सांस्कृतिक संदर्भाचे पुनर्संदर्भीकरण करावे लागते. या अडथळ्यांवर मात करण्यासाठी भाषांतरकाराला भाषांतरासमोर स्वैर भाषांतर, रूपांतर, शब्दशः भाषांतर असे पर्याय उपलब्ध असतात. यापैकी लेखक एखाद्या पर्यायाची निवड करतो आणि त्यातून त्याचे सांस्कृतिक भान देत असतो.

या दृष्टीने आंधळ्यांची शाळा या नाटकाचा विचार करीत असताना वर्तकांनी या बाबीमध्ये पुनर्संदर्भीकरण करण्याचे कार्य केलेले आहे; परंतु या प्रक्रियेत त्यांनी मूळ कलाकृतीचा आत्माच हरवून टाकलेला दिसतो. मूळ नाटकाचे नाव आव्हान, तर त्यांनी आंधळ्यांची शाळा असे केले. शीर्षकातूनच त्यांची पळवाट दिसते. मूळ नाटकात तीन अंक आहेत, तर येथे त्यांनी चार अंकांची रचना केली. भाषांतरित संहिता पहिल्या दोनच अंकांत मूळ संहितेशी संबंध ठेवते, तर पुढच्या दोन अंकांची रचना स्वतंत्र झालेली दिसते. आव्हानमध्ये नाटकाच्या अंतापर्यंत स्वावा हीच मुख्य पात्र म्हणून वावरते, तर भाषांतरित नाटकाच्या दोन अंकात बिंबा, तर नंतरच्या दोन अंकांत तिचे वडील मनोहर मुख्य केंद्र होतात. दोन्ही कलाकृतींतील पात्रांची सांस्कृतिक पार्श्वभूमी सुशिक्षित घराणे अशी असली तरी दोघांच्या स्त्रीविषयक धारणांमध्ये मात्र खूप अंतर दिसते. म्हणजे ब्यर्नसन 'पुरुषांचे कलंकित चारित्र्य तितकेच चुकीचे आहे जितके स्त्रीचे गृहीत धरले जाते' असे मत व्यक्त करतो. मूळ नाटकात स्वावा विवाहबद्ध होत नाही. येथे सगळे विसरून बिंबा शरण येते आणि कुमारशी तिचा विवाह होतो. स्त्री शिक्षित असली तरी पुरुषांच्या ज्या स्त्रीविषयक पारंपरिक सामाजिक धारणा आहेत त्याच प्रमाण मानल्या जातात. त्यांना लेखक बळकटी देऊन नाटकाचा सुखान्तत शेवट करतात. कुटुंब मोडकळीस येणार नाही, असाही नाटकांतर्गत पात्रे विचार करतात. दोन्ही



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

महाराष्ट्र साहित्य परिषद

स्त्रीपात्रे पुरुषांच्या या दोषांना पोटात घेऊन शरण येतात. हाच खऱ्या अर्थाने मूळ नाटकातील चांगल्या आशयाचा पराभव आहे. भाषांतरकर्त्यांनी आशयात अशी पळवाट का शोधली असावी? याचे कारण भाषांतरकर्ता जेव्हा आपल्या संस्कृतीचे संदर्भ त्या कलाकृतीला लावतो तेव्हा तिच्या म्हणून काही धारणा असतात. त्या धारणा बऱ्याच वेळा मूल्यनिर्धारण करीत असतात. १९३०च्या आसपास ज्या स्त्रीविषयक धारणा होत्या त्या आगरकर- कर्वेप्रणीत स्त्रीवादाच्या असल्या तरी त्यांची मूळ ताकद कागदावरच होती. त्या समाजाच्या तळापर्यंत झिरपल्या नव्हत्या. त्यामुळे या नाटकातील स्त्रीपात्रे स्वतंत्र, कमावती असली तरी त्यांना त्याच पातळीवर जगू न देता वर्तकांनी त्यांना शरण आणण्यातच धन्यता मानलेली दिसते. यातून वर्तकांच्या पुरुषविषयक धारणा दिसतातच, परंतु त्या काळातील बहुसंख्य सुशिक्षित प्रेक्षकही त्याच धारणेचा असावा असे वाटते. लेखक त्या सांस्कृतिक धारणेपुढे शरणागती पत्करतात. येथे कुटुंबसुधारणेच्या चौकटीत स्त्रीसुधारणा गृहीत धरलेली होती. एका अर्थाने ती त्या काळातील सुधारकांनीही प्रतिपादिलेली होती. म्हणून त्यांच्या नाटकातील स्त्रीपात्र सुशीला म्हणते, की 'शॉ आणि इब्सेन यांच्या शाळेत तयार झालेली बायको तुम्हाला कशी आवडेल? तुम्हाला कर्व्यांच्या आश्रमात नाही तर चिपळूणकरांच्या तालमीत तयार झालेली सुगृहिणी चालेल फार झालं तर!'[५] याचा अर्थ आधुनिक शिक्षणातून तयार झालेली स्त्री कशी हवी होती, तर कुटुंब सांभाळणारी सुगृहिणी, जी या नाटकात उभी केली आहे. हा कर्वेप्रणीत स्त्रीशिक्षणाचा प्रभाव दिसतो. इब्सेनचे नाटक जेव्हा युरोपियन रंगभूमीवर आले तेव्हा तत्कालीन युरोप हादरला, असे वर्णन करण्यात येते. परंतु या नाटकाने आपल्याकडे रंगभूमीही फारशी हादरली नाही. नाट्यमन्वंतर या संस्थेचे निर्माणक के. नारायण काळे, अनंत काणेकर, केशवराव भोळे, श्री. वि. वर्तक या समानधर्मीय आणि ध्येयप्रवण मंडळींनी १९३३ मध्ये जेव्हा ही संस्था स्थापन केली होती तेव्हा त्यांच्या या संस्थेचे ध्येय To Introduce the modern intellectual play of Europe to Marathi theatre असे होते. पण अपेक्षित मन्वंतर घडवण्यात या संस्थेला यश आले नाही. ज्या प्रतीचा Intellectual Drama युरोपमध्ये यशस्वी झाला तसा येथे यशस्वी व्हावा असे बौद्धिक वातावरणही नव्हते. जे होते ते प्रभावीरीत्या प्रकट करण्यापेक्षा नाट्यमन्वंतरने प्रस्थापित अभिरुचीशी जुळवून घेतले. वाजवीपेक्षा अधिक तडजोडी करून विचाराची धारच बोथट केली. या लोकांना इब्सेन प्रिय असला तरी तो विचारदृष्ट्या नसून व्यवसायदृष्ट्या प्रिय होता. त्याच्या जीवनदृष्टीपेक्षा त्याचे नाट्यतंत्र आर्थिकदृष्ट्या आपल्या मंडळींना परवडणारे वाटले. त्यामुळे काळाने केलेल्या कोंडीत नाटक जिवंत ठेवण्यासाठी या मंडळींनी केलेल्या कसरतीपलीकडे यांच्या प्रयत्नांना फारसा अर्थ उरला नाही.

वर्तक किंवा नाट्यमन्वंतर यांनी असे कोणते कार्य केलेले आहे की ज्यामुळे इतिहासकार आणि कोशकारांनी त्यांच्यावर एवढी स्तुतिसुमने उधळलेली आहेत? तर या बाबतीत नोंदवता येण्यासारखी गोष्ट म्हणजे नाटकात स्त्रियांच्या भूमिका स्त्रियांनीच कराव्यात, या भूमिकेचा अट्टहास धरला. जोत्स्ना भोळेसारखी उत्तम अभिनेत्री, कुशल गायिका मराठी रंगभूमीला दिली. त्यामुळे नाट्यमन्वंतर ही संस्था अस्तित्वात येऊन समाप्ती होण्याला तितकाच काळ जवळजवळ लोटलेला असला, तरी 'गाव वाहून जाते आणि नाव राहून जाते' अशी स्थिती मराठी रंगभूमीच्या इतिहासात झालेली दिसते. दुसरी गोष्ट म्हणजे रंगभूमीवर बोलपटाचे आक्रमण होत असताना नाटकाचा वेळ कमी करून प्रेक्षक खिळवून ठेवण्याचे काम नाट्यमन्वंतरने केले. वास्तवात हे नाटकाच्या बाह्यांगातले बदल आहेत. यालाच रंगभूमीवरील क्रांती समजून अभ्यासकांनी त्यांची भलावण केली. खरे पाहता त्यांचे हे नाटक आधुनिकता वगैरे आणणारे नसून आधुनिकतेची पाठराखण करणाऱ्या एका चांगल्या नाटकातील आधुनिकता संकुचित करणारे आहे हे दोन्ही नाटके डोळ्यांसमोर ठेवून वाचल्यास सहज लक्षात येईल.

●

**प्रा. नागनाथ बळते**
मराठी विभाग,
फर्ग्युसन महाविद्यालय, पुणे.
चलभाष : ९५४५२९१९४३

**संदर्भ :**

१. सरवटे वि. सि., मराठी साहित्य समालोचन, इंदोर, १९३७, पृ. ५१७, ५१८.
२. लागू रा. कृ. (उपोद्घात) वर्तक श्री. वि., आंधळ्यांची शाळा, १९४३ दु. आ. पृ. २.
३. वर्तक श्री. वि., आंधळ्यांची शाळा, उनि. निवेदन.
४ सप्रे अविनाश, भाषांतरांची सांस्कृतिक सापेक्षता, भाषांतरविद्या स्वरूप आणि समस्या, संपा., रमेश वरखेडे, य.च.म.मु. विद्यापीठ नाशिक, १९९७, पृ. २९.
५. वर्तक श्री. वि., आंधळ्यांची शाळा, उनि., पृ. ०९.
६. काळे नारायण के., नाट्यमन्वंतर निर्मिती आणि अखेर, माणूस, दिवाळी अंक, १९८३, पृ. २२१.

**(टीप : सदर लेख हा सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठाच्या मराठी विभागांतर्गत सुरू असलेल्या 'एकोणिसावे शतक : भाषा, इतिहास आणि संस्कृती' या बृहद्‌शोध प्रकल्पांतर्गत डॉ. विद्यागौरी टिळक यांच्या मार्गदर्शनानुसार केलेल्या 'एकोणिसाव्या शतकातील मराठी रंगभूमी' या विषयाच्या अभ्यासांतर्गत लिहिलेला आहे.)**



अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

## विशेष ग्रंथकार पुरस्कार (२६ मे २०१६)

| पुरस्काराचे नाव | पुरस्कार विजेते | |
|---|---|---|
| • प्रा. न. र. फाटक (संतसाहित्य) | चैतन्य महाराज देगलुरकर | |
| • राजा फडणीस पुरस्कृत रामाचार्य अवधानी पुरस्कार (तत्त्वज्ञानविषयक) | डॉ. सुलभा ब्रह्मनाळकर | |
| • कविवर्य भा. रा. तांबे पुरस्कार (ज्येष्ठ कवी-कवयित्रीस) | अंजली कुलकर्णी | |
| • कविवर्य ना. घ. देशपांडे पुरस्कार (गेय कविता) | प्रकाश घोडके | |
| • म. ना. गोगटे पुरस्कृत गो. रा. परांजपे पुरस्कार (विज्ञानविषयक) | डॉ. अनिल लचके | |
| • श्रीपाद जोशी पुरस्कार (संदर्भ ग्रंथ, अनुवाद-आंतरभारती कार्य) | डॉ. वेदकुमार वेदालंकार | |
| • कमलाकार सारंग पुरस्कार (नाट्यविषयक) | राजकुमार तांगडे | |
| • यशवंतराव गडाख पुरस्कृत श्रीमती ताईसाहेब कदम पारितोषिक (साहित्य पत्रिकेतील उत्कृष्ट लेख) | 'म. सा. पत्रिका, अंक क्र. ३५०' डॉ. सदानंद मोरे : महाराष्ट्राच्या लोकव्यवहाराचा मार्मिक अभ्यासक | डॉ. राजा दीक्षित |

## वार्षिक ग्रंथ पारितोषिक (२६ मे २०१६)

| पारितोषिकाचे नाव | ग्रंथाचे नाव | पारितोषिक विजेते |
|---|---|---|
| • ह. ना. आपटे पारितोषिक (कादंबरी) | 'शोध' | स्व. मुरलीधर खैरनार |
| • आनंदीबाई शिर्के पारितोषिक (कथासंग्रह) | 'ढोरवाटा' | विलास केळसकर |
| • म. वि. गोखले पारितोषिक (नाट्यविषयक) | 'शेक्सपिअर आणि मराठी नाटक' | डॉ. लता मोहरीर |
| • रा. ना. नातू पारितोषिक (इतिहासविषयक) | 'साद नर्मदेची' | सुधाकर लोंढे |
| • सत्यशोधक केशवराव विचारे पारितोषिक (ललितेतर वैचारिक) | सहजीवनातील प्रकाशवाटा' | डॉ. नीला पांढरे |
| • शि. म. परांजपे पारितोषिक (ललितेतर वैचारिक) | 'नवे जग नवी तगमग' | कुमार शिराळकर |
| • अभिजात पारितोषिक (सामाजिक शास्त्रे) | बलुतेदारांची हत्यारे आणि अवजारे | डॉ. प्रल्हाद लुलेकर |
| • शंकर पाटील पारितोषिक (कादंबरी) | 'जोहार' | सुशील घसकटे |
| • दि. बा. मोकाशी पारितोषिक (प्रवासवर्णन) | 'आफॅबीट भटकंती-२' | जयप्रकाश प्रधान |
| • ग. ह. पाटील पारितोषिक (शिक्षणविषयक) | 'आमच्या शिक्षणाचे काय?' | हेरंब कुलकर्णी |
| • नी. स. गोखले पारितोषिक (उत्कृष्ट ग्रंथनिर्मिती) | 'करिअरचा पासवर्ड' | गजेंद्र बडे |
| • पुष्पलता रानडे पुरस्कृत लक्ष्मीबाई टिळक पारितोषिक (आत्मचरित्र) | 'हाणला कोयता झालो मास्तर' | डॉ. सुभाष शेकडे |
| • शिवाजी सावंत पुरस्कृत राधाबाई सावंत स्मरणार्थ 'मृत्युंजय' पारितोषिक (पौराणिक, वेदपुराण, रामायण, महाभारत) | 'मी अश्वत्थामा चिरंजीव' | अशोक समेळ |
| • कमल व के. पी. भागवत पारितोषिक (मानसशास्त्र, समाजशास्त्र, स्त्रीजीवनविषयक) | 'गुडमॉर्निंग नमस्ते' | डॉ. शाम अष्टेकर |
| • स. रा. गाडगीळ पुरस्कृत विजया गाडगीळ पारितोषिक (उत्कृष्ट वाङ्मयमूल्य) | 'ग्रेस : वेदना आणि सौंदर्य | डॉ. अजय देशपांडे |



अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

| | | |
|---|---|---|
| • डॉ. अरविंद वामन कुलकर्णी पारितोषिक (समीक्षा) विभागून | 'रंगनाथ पठारे यांच्या साहित्यातील स्त्री-दर्शन'<br>'महाराष्ट्रातील विस्थापित आणि मराठी कादंबरी' | डॉ. राजेंद्र सलालकर<br>डॉ. संजय नगरकर |
| • वि. वि. बोकिल पारितोषिक | 'वजनदार' (गद्य) | डॉ. सुमन नवलकर |
| • (उत्कृष्ट बालवाङ्मय विभागून) | 'नवलनगरी' (पद्य) | रमेश तांबे |
| • अंबादास माडगूळकर पारितोषिक (सामाजिक आशय) | 'गंगे तुझ्या तीराला' | चंद्रकांत कुलकर्णी |
| • शरश्चंद्र मनोहर भालेराव पारितोषिक (लक्षवेधी साहित्य ग्रंथ) | 'पॉप्युलर रीतिपुस्तक' | रामदास भटकळ, मृदूला जोशी |
| • शरश्चंद्र मनोहर भालेराव पारितोषिक (प्रबंधलेखन) | 'सत्यशोधकांचा साहित्यविषयक दृष्टिकोन : एक अभ्यास' | डॉ. सुधाकर जाधव |
| • सागर/वसुंधरा शिरोळे पुरस्कृत डॉ. पुष्पलता पारितोषिक (आहार, आरोग्य) | 'अचूक निदान' | डॉ. रवी बापट शिरोळे |
| • मालिनी शिरोळे पारितोषिक (स्तंभलेखन) | 'गूळेर' | बाबू गंजेवार |
| • ॲड. त्रिंबकराव शिरोळे पारितोषिक (ललितगद्य) विभागून | 'अनवाणी पाय'<br>'एक झोका' | प्रा. आप्पासाहेब खोत<br>डॉ. मंदा खांडगे |
| • माधुरी वैद्य पुरस्कृत श्रीवत्स प्रकाशन (संपादित ग्रंथ) | 'स्त्री साहित्याचा मागोवा - खंड ४' | डॉ. मंदा खांडगे, डॉ. नीलिमा गुंडी डॉ. ज्योत्स्ना आफळे |
| • प्रभाकर संत पुरस्कृत आशा प्र. संत पुरस्कार (संपादन क्षेत्रातील लक्षणीय) | 'केल्याने भाषांतर' | अनघा भट |
| • डॉ. उज्ज्वला गोखले पुरस्कृत सुभाष हरी गोखले पारितोषिक (बँकिंग, व्यवस्थापन, अर्थशास्त्र) | 'मार्केट मेकर्स' | चंद्रशेखर टिळक |

**म. सा. प. पुरस्कारांसाठी परीक्षण केलेल्या मान्यवरांची नावे**

महेंद्र मुंजाळ, प्रा. रूपाली शिंदे, डॉ. पुरुषोत्तम काळे, प्रमोदिनी वडके-कवळे, प्रभा सोनवणे, प्रा. प्रविण भोळे, महेश तेंडुलकर, अजित पटवर्धन, डॉ. कल्याणी दिवेकर, नंदा सुर्वे, शिरीष चिटणीस, डॉ. संदीप सांगळे, प्रा. सुजाता शेणई, संतोष शेणई, डॉ. सु. प्र. कुलकर्णी, ह. ल. निपुणगे, ॲड. प्रमोद आडकर, डॉ. नीलिमा गुंडी, डॉ. वंदना बोकील-कुलकर्णी, माधव राजगुरू, वि. दा. पिंगळे, डॉ. उज्ज्वला गोखले, डॉ. वर्षा तोडमल, डॉ. मंदा खांडगे. सर्व परिक्षकांचे आभार!

● **उद्धव कानडे** (कार्यवाह, वार्षिक ग्रंथ पारितोषिके)

## निवेदन

- वार्षिक ग्रंथ व ग्रंथकार पारितोषिक व म.सा.प. वर्धापनदिनासाठी खालील संस्थांनी आर्थिक सहकार्य केले. या संस्थांचे म.सा.प. पुणे याजकडून आभार!
- बँक ऑफ महाराष्ट्र (नवी पेठ), पुणे पीपल्स को-ऑप. बँक (पेरूगेट), दि विश्वेश्वर बँक (सदाशिव पेठ), जनता सहकारी बँक (कर्वे रोड), लोकमान्य को. ऑप. बँक (नवी पेठ), टी.जे.एस.बी. (कोथरूड) आणि लिज्जत पापड या सर्वांनी आर्थिक सहकार्य केले.
- महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणेच्या वतीने डॉ. शकुंतला क्षीरसागर यांचे बंधू कै. विलास शंकर रानडे यांच्या स्मृतिप्रीत्यर्थ एक विशेष मानाचा पुरस्कार दिला जातो. क्रीडा क्षेत्रातील मराठी पुस्तकाच्या लेखकाला ऑगस्ट २०१६ मध्ये हा पाच हजार रुपयांचा पुरस्कार दिला जाणार आहे. या पुरस्कारासाठी २०१५-२०१६ मध्ये प्रसिद्ध झालेल्या क्रीडाविषयक पुस्तकाच्या २ प्रती लेखक/प्रकाशकांनी या पत्त्यावर पाठवाव्यात : कार्याध्यक्ष, महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रोड, पुणे ४११०३०. पुस्तक पाठविण्याची अंतिम तारीख दि. १० जुलै २०१६.





मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद








# महाराष्ट्र साहित्य परिषद
# मुख्य शाखा कार्यवृत्त
## (१ एप्रिल २०१६ ते १५ जून २०१६)

**म. सा. प. गप्पा :**

१ एप्रिल २०१६ रोजी नव्या पदाधिकाऱ्यांनी सूत्रे हाती घेतल्यानंतर म.सा.प.मध्ये साहित्यिकांचा, रसिकांचा राबता वाढावा म्हणून म.सा.प. गप्पा हा अभिनव उपक्रम सुरू केला. लेखक, कवी, प्रकाशक आणि साहित्यव्यवहाराशी निगडित व्यक्तिमत्त्वांना ऐकण्याचा, समजून घेण्याचा प्रयत्न या उपक्रमातून अभिप्रेत आहे.

११ एप्रिल २०१६ रोजी सुप्रसिद्ध निवेदक मा. सुधीर गाडगीळ यांच्या हस्ते म.सा.प. गप्पा या कार्यक्रमाचे उद्घाटन झाले. ख्यातकीर्त साहित्यिक मा. राजन खान यांची मुलाखत नीलिमा बोरवणकर यांनी घेतली. म.सा.प. गप्पांतील ही पहिली मुलाखत विशेष गाजली. रसिकांचा उत्तम प्रतिसाद, भरलेले सभागृह आणि राजन खान यांनी प्रकाशन व्यवसाय, प्रकाशक यांच्याविषयी व्यक्त केलेल्या मतांनी ही मुलाखत लक्षवेधी ठरली. या प्रसंगी प्रा. मिलिंद जोशी, प्रकाश पायगुडे आणि सुनीताराजे पवार हे पदाधिकारी आणि पुणे शहर कार्यवाह उपस्थित होते. कार्यक्रमाचे नियोजन आणि सूत्रसंचालन वि. दा. पिंगळे यांनी केले.

म.सा.प. गप्पांमधील दुसरा कार्यक्रम १० मे २०१६ रोजी झाला. सुप्रसिद्ध मुखपृष्ठकार, चित्रकार मा. रविमुकुल यांची मुलाखत परिषदेच्या माधवराव पटवर्धन सभागृहात वंदना बोकील-कुलकर्णी यांनी घेतली. रसिकांचा प्रतिसाद उत्तम होता. रविमुकुल यांनी दिलेल्या मोजक्या पण अचूक शब्दांत दिलेल्या उत्तरांमुळे मुलाखत रंगली. जवळपास तीन हजार पुस्तकांच्या मुखपृष्ठांची निर्मिती करणाऱ्या रविमुकुल यांनी 'साहित्यिकांमध्ये चित्रसाक्षरतेचे प्रमाण खूप कमी आहे' असे मत व्यक्त केले. त्यांचा या क्षेत्रातील खडतर प्रवास रसिकांना अंतर्मुख करून गेला.

**डॉ. बाबासाहेब आंबेडकर जयंतीनिमित्त व्याख्यान :**

१४ एप्रिल २०१६ रोजी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या शतकोत्तर रौप्यमहोत्सवी जयंती निमित्त सुप्रसिद्ध साहित्यिक, विचारवंत प्रा. हरि नरके यांचे माधवराव पटवर्धन सभागृह मसाप येथे 'आधुनिक भारताचे निर्माते' या विषयावर वाख्यान आयोजित केले होते.

**११० वा वर्धापनदिन समारंभ**

महाराष्ट्र साहित्य परिषदेचा वर्धापनदिन समारंभ २६ व २७ मे २०१६ रोजी संपन्न झाला. गुरुवार दि. २६ मे २०१६ रोजी सायं. ५ ते ८ या वेळात एस.एम.जोशी सभागृहात म.सा.प. जीवन गौरव पुरस्कार आणि भीमराव कुलकर्णी कार्यकर्ता पुरस्कार तसेच वार्षिक ग्रंथ व ग्रंथकार पारितोषिके मान्यवरांच्या हस्ते सन्मानपूर्वक प्रदान करण्यात आली. ज्येष्ठ नाटककार मा. प्रेमानंद गज्वी यांना म.सा.प. जीवनगौरव पुरस्कार, तर सीमाभागात मराठी साहित्य संमेलने भरवून मराठीचा प्रसार करणारे प्रा. वैजनाथ महाजन यांना 'भीमराव कुलकर्णी कार्यकर्ता पुरस्कार ज्येष्ठ साहित्यिक मा. अरुण साधू यांच्या हस्ते देण्यात आला.

राजा फडणीस पुरस्कृत उत्कृष्ट म.सा.प. शाखा पुरस्कार व फिरता करंडक फलटणच्या म.सा.प. शाखेला देण्यात आला. रत्नाकर कुलकर्णी यांच्या स्मृतिप्रीत्यर्थ दिला जाणारा म.सा.प. कार्यकर्ता पुरस्कार मा. राजन लाखे आणि मा. ह. ल. निपुणगे यांना देण्यात आला. पुरस्कार सोहळ्याच्या अध्यक्षस्थानी म.सा.प.चे अध्यक्ष आणि ज्येष्ठ विचारवंत मा. रावसाहेब कसबे होते. ज्येष्ठ साहित्यिक आणि अ. भा. मराठी साहित्यसंमेलनाचे पूर्वाध्यक्ष मा. अरूण साधू यांच्या हस्ते पुरस्कारांचे वितरण करण्यात आले.

आपल्या मनोगतात अरुण साधू यांनी 'मराठी भाषेवर इंग्रजीचे होत असलेले अतिक्रमण आणि मराठीचे सद्यकालीन वास्तव' यावर चिंतनशील भाष्य केले. मराठी भाषा समृद्ध करण्यासाठी, टिकविण्यासाठी आणि तिचे वैभव वृद्धिंगत करण्यासाठी सर्व पातळ्यांवर प्रयत्न करण्याची गरज आहे, असे त्यांनी नमूद केले. अध्यक्ष डॉ. रावसाहेब कसबे यांनी मराठी भाषेची समृद्ध परंपरा, तिचे वेगळेपण मांडले. प्रा. मिलिंद जोशी यांनी अभ्यासपूर्ण प्रास्ताविक केले, तर प्रमुख कार्यवाह प्रकाय पायगुडे यांनी यथोचित आभार मानले. उत्तरोत्तर रंगत गेलेल्या या कार्यक्रमाचे प्रभावी सूत्रसंचालन कार्यवाह उद्धव कानडे यांनी केले. या प्रसंगी सभागृह पूर्ण भरून गेल्याने रसिकांनी उभे राहून आणि मार्गिकेत बसून कार्यक्रमाचा आस्वाद घेतला. कोषाध्यक्ष सुनीताराजे पवार यांनी मान्यवरांचे आपुलकीने स्वागत केले.

**शोकसभा : प्रा. रा. ग. जाधव**

दि. ३० मे २०१६ रोजी ज्येष्ठ समीक्षक, साहित्यिक, माजी अ. भा. म. सा. संमेलनाचे अध्यक्ष प्रा. रा. ग. जाधव यांना श्रद्धांजली अर्पण करण्यासाठी माधवराव पटवर्धन सभागृहात श्रद्धांजली सभेचे आयोजन केलेले होते. डॉ. अरूणा ढेरे यांच्या अध्यक्षतेखाली आयोजित केलेल्या या आदरांजली सभेत अनेक मान्यवरांनी जाधव सरांबाबतचे आपले विचार, आठवणी व्यक्त केल्या. त्यात संतोष शेणई, जयराम देसाई, डॉ. माधवी वैद्य, हेमंत नाईकनवरे, डॉ. कल्याणी दिवेकर, डॉ. वि. भा. देशपांडे, डॉ. राजा दीक्षित, डॉ. पुरुषोत्तम काळे, प्रा. मिलिंद जोशी, विनोद शिरसाट या मान्यवरांनी आदरांजली वाहिली. मा. प्रकाश पायगुडे यांनी सुत्रसंचालन केले. अनेक वाचक, रसिक शोकसभेला



अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

उपस्थित होते.

**रेखा ढोले स्मृती पुरस्कार :**

ख्यातनाम लेखिका रेखा ढोले यांच्या स्मृतिप्रीत्यर्थ राजहंस प्रकाशन, ढोले परिवार आणि म.सा.प.च्या वतीने रेखा ढोले स्मृती पुरस्कारांचे वितरण परिषदेच्या माधवराव पटवर्धन सभागृहात २९ मे २०१६ रोजी करण्यात आले.

मराठी अनुवाद क्षेत्रातील उल्लेखनीय योगदानाबद्दल मा. रवींद्र गुर्जर यांना २५००० रु. रोख व मानचिन्ह प्रदान करण्यात आले. सर्वोत्कृष्ट निर्मितिमल्ये, मुखपृष्ठ व अंतर्गत सजावटीसाठी मा. पुंडलिक वझे यांना 'वोस्कीच्या गोष्टी' या पुस्तकासाठी १५००० रु. व मानचिन्ह प्रदान करण्यात आले. तसेच ग्रंथाली प्रकाशनास सर्वोत्कृष्ट निर्मितिमूल्ये, मुखपृष्ठ आणि अंतर्गत सजावटीसाठी १०००० रु. आणि मानचिन्ह प्रदान करण्यात आले. रेखा ढाले यांच्य स्मृतिप्रीत्यर्थ हे पुरस्कार देण्यात येतात. आटोपशीर आणि नीटनेटक्या झालेल्या या कार्यक्रमात मान्यवरांनी यथोचित भाषणे केली. कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी यांनी प्रास्ताविक केले. प्रमुख कार्यवाह प्रकाश पायगुडे यांनी आभार मानले. कोषाध्यक्ष सुनीताराजे पवार यांनी पाहुण्यांचे स्वागत केले. कार्यवाह बंडा जोशी यांनी सूत्रसंचालन केले. ●



# शाखा कार्यवृत्त

## (दि. १ एप्रिल २०१६ ते १५ जून २०१६)

**१) इस्लामपूर, ता. वाळवा जि. सांगली**

इस्लामपूर शाखेने १ एप्रिल २०१५ ते ३१ मार्च २०१६ या वर्षात विविध उपक्रम घेतले. १४ एप्रिल २०१५ रोजी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या जयंतीनिमित्त 'जयंती सोहळा व ग्रंथ प्रकाशन समारंभ घेण्यात आला.

मसाप शिराळा शाखेचे अध्यक्ष, अभ्यासू व्यासंगी प्राध्यापक, संत साहित्याचे अभ्यासक, दिग्दर्शक, लेखक प्राचार्य शिवाजीराव कुंभार यांची श्रद्धांजली सभा घेऊन सरांच्या कार्याबद्दल अनेक मान्यवरांनी आपले विचार व्यक्त केले. सर्वांच्या वतीने श्रद्धांजली अर्पण करण्यात आली.

२६ जुलै २०१५ - रोजी महाकवी कालीदास साहित्य संमेलनाचे आयोजन केले होते. प्रा. जी. व्ही. कुलकर्णी हे संमेलनाध्यक्ष होते.

१३ डिसेंबर २०१५ रोजी लोकनेते राजारामबापू पाटील यांच्या स्मृतीप्रित्यर्थ एक दिवसीय मराठी साहित्य संमेलन घेण्यात आले. सुप्रसिद्ध कवयित्री नीरजा या संमेलनाच्या अध्यक्षा होत्या. संमेलनाचे उद्घाटक प्रा. डॉ. वि. रा. तोडकर तर स्वागताध्यक्ष मा. सदानंद तुकाराम पाटील हे होते. अतिशय यशस्वीरित्या, वैचारिकदृष्ट्या उपयुक्त असे संमेलन पार पडले.

या प्रमुख कार्यकर्त्यांच्या व्यतिरिक्त इतरही अनेक उपक्रम इस्लामपूर शाखेने घेतले. त्यात तबलावादन स्पर्धा, रंगभूमी दिन, प्राचार्य शरद भोसले स्मृतिदिन, मसान वर्धापन दिन, प्रा. शामराव पाटील यांना मसाप आदर्श कार्यकर्ता पुरस्कार मिळाल्याबद्दल सत्कार समारंभ डॉ. शिवाजीराव घोरपडे स्मृतीदिन इ.

**२) मंगळवेढा मसाप शाखा, जि. सोलापूर**

मराठी राजभाषा दिनाच्या निमित्ताने २८/२/२०१६ रोजी ज्येष्ठ साहित्यिक डॉ. द. ता. भोसले यांचे 'लोकोत्तर गाडगेबाबा' या विषयावर व्याख्यान आयोजित केले होते.

मसाप शाखा मंगळवेढा आणि सप्तर्षी प्रकाशन यांच्या संयुक्त विद्यमाने राज्यस्तरीय कथा पुरस्कार वितरण सोहळा दि. २७ मार्च २०१६ रोजी घेण्यात आला. अभ्यासू संपादक मा. संजय आवटे यांचे व्याख्यान यासोबत मान्यवरांचे कविसंमेलन, पुस्तक प्रकाशनही आयोजित केलेले होते. डॉ. द. ता. भोसले, (ज्येष्ठ साहित्यिक) माजी मंत्री प्रा. लक्ष्मणराव ढोवळे, समाधान आवताडे उपस्थित होते.

**३) मसाप - जुळे सोलापूर शाखा**

मसाप जुळे सोलापूर शाखा आणि वसुंधरा महाविद्यालय यांच्या विद्यमाने मराठी भाषा दिन डॉ. बाबासाहेब आंबेडकर शतकोत्तर रौप्य महोत्सवी जयंती निमित्त 'कवितेची निर्मिती प्रक्रिया' या विषयावर कार्यशाळा आयोजित केलेली होती. प्रास्ताविक शाखेचे अध्यक्ष डॉ. वासुदेव रायते यांनी केले तर उद्घाटन जिल्हा प्रतिनिधी पद्माकर कुलकर्णी यांनी केले. प्रा. हनुमंत मते यांनी कवींना मार्गदर्शन केले.

मसाप शाखा जुळे सोलापूर व जोशी परिवार सोलापूर यांच्या संयुक्त विद्यमाने देण्यात येणारा स्व. श्रीनिवास जोशी गुरुजी आदर्श शिक्षक पुरस्कार मा. रामचंद्र भीमराव कुलकर्णी यांना देण्यात आला. जिल्हा प्रतिनिधी व इतर मान्यवराच्या उपस्थितीत हा पुरस्कार देण्यात आला.

मसाप शाखा जुळे सोलापूर आणि डॉ. वासुदेव रायते परिवार यांच्या संयुक्त विद्यमाने दिला जाणारा स्व. श्रीनिवास रायते गुरुजी बालसाहित्यिक पुरस्कार रविवार दि. २७ मार्च २०१६ रोजी सुप्रसिद्ध साहित्यिका डॉ. विजया वाड यांना डॉ. संगीता वर्वे यांच्या हस्ते देण्यात आला. या कार्यक्रमात कार्यवाह प्रशांत जोशी यांना राज्यशासनाचा उत्कृष्ट पत्रकारितेचा सन्मानाचा पुरस्कार जाहीर झाल्याबद्दल सत्कार करण्यात आला.

**मसाप पाचोरा शाखा जि. जळगाव**

मसाप शाखा पाचोरा यांच्या वतीने मा. दत्तात्रय कडू लोहार लिखित 'उघड कवाडे तर हृदयाची' या काव्यसंग्रहाचे प्रकाशन प्राचार्य डॉ. किसन पाटील यांच्या हस्ते करण्यात आले. पाचोरा मसाप शाखेचे अध्यक्ष प्राचार्य डॉ. बी. एन. पाटील, प्रा. डॉ. वासुदेव वले, श्री. अजय अहिरे यांच्या उपस्थितीत ३ मे २०१६ रोजी पाचोरा महाविद्यालयात प्रकाशन सोहळा संपन्न झाला.

● (शब्दांकन : वि. दा. पिंगळे)



अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

महाराष्ट्र साहित्य परिषद

# महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे

## विश्वस्त, पदाधिकारी व कार्यकारी मंडळ (२०१६-२०२१)

(१ एप्रिल २०१६ पासून)

### विश्वस्त मंडळ

| **प्रा. डॉ. शिवाजीराव कदम** | **श्री. उल्हासराव पवार** | **श्री. यशवंतराव गडाख** |
|---|---|---|
| अध्यक्ष | कार्यकारी विश्वस्त | सदस्य |

### पदाधिकारी व कार्यकारी मंडळ

अध्यक्ष - **डॉ. रावसाहेब कसबे**

| **डॉ. तारा भवाळकर** | **श्रीमती निर्मला ठोकळ** | **श्री. चंद्रकांत शेवाळे** |
|---|---|---|
| उपाध्यक्ष | उपाध्यक्ष | उपाध्यक्ष |

| **प्रा. मिलिंद जोशी** | **श्री. प्रकाश पायगुडे** | **सौ. सुनीताराजे पवार** | **डॉ. पुरुषोत्तम काळे** |
|---|---|---|---|
| कार्याध्यक्ष | प्रमुख कार्यवाह | कोषाध्यक्ष | पत्रिका संपादक |

### स्थानिक कार्यवाह

व्याख्याने व स्मृतिदिन - **श्री. दीपक करंदीकर**
वार्षिक ग्रंथ पारितोषिके - **श्री. उद्धव कानडे**
ग्रंथालय विभाग - **श्री. वि. दा. पिंगळे**
विशेष पारितोषिके - **श्री. बंडा जोशी**
परीक्षा विभाग - **श्री. माधव राजगुरू**
अतिथीनिवास-वास्तू देखभाल - **ॲड. प्रमोद आडकर**

### विभागीय कार्यवाह

**श्री. विनोद कुलकर्णी** (सातारा जिल्हा)
**प्राचार्य तानसेन जगताप** (जळगाव जिल्हा)

### सदस्य

**डॉ. अरविंद संगमनेरकर** (पुणे शहर)
**डॉ. सतीश देसाई** (पुणे शहर)
**श्री. शिरीष चिटणीस** (पुणे शहर)
**श्री. रावसाहेब पवार** (पुणे जिल्हा)
**श्री. राजन लाखे** (पुणे जिल्हा)
**डॉ. पुरुषोत्तम काळे** (पुणे जिल्हा)
**श्री. रवींद्र बेडकीहाळ** (सातारा जिल्हा)
**श्री. विनोद कुलकर्णी** (सातारा जिल्हा)
**श्री. सोपानराव चव्हाण** (सातारा जिल्हा)
**श्री. पद्माकर कुलकर्णी** (सोलापूर जिल्हा)
**ॲड. जे. जे. कुलकर्णी** (सोलापूर जिल्हा)
**श्री. कल्याण शिंदे** (सोलापूर)
**श्री. राजेंद्र मुठाणे** (कोल्हापूर जिल्हा)
**श्री. प्रकाश देशपांडे** (कोकण)
**श्री. प्रभाकर संत** (ठाणे जिल्हा)
**श्री. पद्माकर शिरवाडकर** (ठाणे जिल्हा)
**श्री. सुरेश देशपांडे** (ठाणे जिल्हा)
**श्री. प्रकाश होळकर** (नाशिक जिल्हा)
**ॲड. नितीन ठाकरे** (नाशिक जिल्हा)
**श्री. चंद्रकांत पालवे** (अहमदनगर जिल्हा)
**श्री. जयंत येलुलकर** (अहमदनगर जिल्हा)
**प्राचार्य तानसेन जगताप** (जळगाव जिल्हा)
**डॉ. शशिकला पवार** (धुळे जिल्हा)
**प्रा.दशरथ पाटील** (सांगली जिल्हा)



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

# मराठी वाङ्‌मयाचा इतिहास

संपूर्ण संच ५२५०/- रुपयांत

## संचाची किंमत

| | | |
|---|---|---|
| खंड १ ला : | | रु. ५००/- |
| खंड २ रा : | भाग १ : | रु. ७००/- |
| | भाग २ : | रु. ७००/- |
| खंड ३ रा : | | रु. ३५०/- |
| खंड ४ था : | | रु. ४००/- |
| खंड ५ वा : | भाग १ : | रु. ३५०/- |
| | भाग २ : | रु. ३५०/- |
| खंड ६ वा : | भाग १ : | रु. ३५०/- |
| | भाग २ : | रु. ३००/- |
| खंड ७ वा : | भाग १ : | रु. ७००/- |
| | भाग २ : | रु. ८००/- |
| | भाग ३ : | रु. ७००/- |
| | भाग ४ : | रु. ७००/- |
| | | एकूण रु. ७०००/- |

**शाळा, महाविद्यालये आणि व्यक्तिगत ग्राहकांनाही रु. ५२५०/-** डिमांड ड्राफ्टने आगाऊ पाठविल्यास संपूर्ण संच आमच्या खर्चाने रेल्वे अगर एस.टी. पार्सलने पाठवू. (वरील संचातील सुटे भाग हवे असल्यास ग्रंथविक्रेत्यांना २५ टक्के सूट. व्यक्तिगत ग्राहकांना व संस्थांना १५ टक्के सूट. टपालखर्च वेगळा.)

मागणीसाठी संपर्क : **महाराष्ट्र साहित्य परिषद,** टिळक रस्ता, पुणे - ४११ ०३०. दूरभाष : ०२० - २४४७५९६३


बुक-पोस्ट


प्रेषक
प्रमुख कार्यवाह,
**महाराष्ट्र साहित्य परिषद,**
टिळक रस्ता, पुणे - ४११ ०३०.
दूरभाष : ०२०-२४४७५९६३



Maharashtra Sahitya Patrika. Quarterly : June 2016
Registered with the Register of Newspaper for India under No. 6398/57
Book Pkt. Periodical Category



अनुक्रमणिका




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद